# कल्पित आणि सत्य

[ कथा संग्रह ]

लेखक

पं. महादेवशास्त्री जोशी

नोव्हेंबर
१९५२




किंमत
२। रुपये

मॉडर्न बुकडेपो, पुणें २.

श्री. डॉ. भास्करराव फाटक

M. B.

आणि

चि. सौ. जयश्री

यांस

प्रीतिपूर्वक अर्पण.

# केवळ आभारापुरतें—

*माझा हा पांचवा कथासंग्रह प्रकाशित होत असलेला पाहून मला हर्ष होणें स्वाभाविक आहे. कारण तो 'मोहनवेल' च्या पाठोपाठ लगेच पुढें येत आहे. हाताच्या बोटांवर मोजण्याइतके तरी माझे कथासंग्रह आहेत, एवढें समाधान आज त्यानें मला दिलें आहे. रसिक वाचकांना तो रुचला तर याच समाधानाची दुगुण, चौगुण होईल. मॉडर्न बुकडेपोचे संचालक आणि माझे मित्र श्री. रा. प्र. कानिटकर यांना प्रामुख्यानें हें श्रेय आहे. तेव्हां ते, मुद्रक म्हणून चित्रशाळा प्रेसचे व्यवस्थापक आणि चित्रकार म्हणून श्री. ओंकार या त्रिमूर्तींचे मी मनःपूर्वक आभार मानतों.*

पुणें<br>बलिप्रतिपदा<br>शके १८७४

**लेखक**

---

# कल्पित आणि सत्य १

त्या दिवशीं सगळ्या पुणें शहरावर थंडीची लाट कोसळली होती. सकाळचे दहा वाजले तरी उन्हांत दम नव्हता. आणि अशा वेळीं मी सेवासदनचौकांत जिमखान्याकडे जाणाऱ्या बसची मार्गप्रतीक्षा करीत उभा होतों. माझी दृष्टि उजव्या बाजूकडे वळून राहिली होती आणि त्यामुळेंच डाव्या हाताला आणखी एक उतारू येऊन खडा झाला आहे याची किती तरी वेळ मला दखल नव्हती. मानेला रग लागली म्हणून मी जेव्हां तोंड वळवलं तेव्हांच ती गोष्ट मला कळली.

फिकट जांभळ्या रंगाचें पातळ नेसून माझ्यापासून अवघ्या एका हातावर ती उभी होती. तिला माझ्याप्रमाणेंच बसमधून जायचं होतं हें नक्की. नाहीं तर त्या प्रशस्त डांबरी रस्त्यावरून स्वेटर अन् गरम पोलकीं घातलेल्या नरनारींचे घोळके जात येत होते त्यांतच तीहि सामील झाली असती.

एका दृष्टिक्षेपांत मी तिला समग्र पण ओझरती न्याहाळली अन् मग समोरच्या खांबावर नजर स्थिर केली. पण मला आणखी एकदांच तिच्याकडे दृष्टि टाकणं भाग होतं. एकाच गोष्टीची मला खात्री करून घ्यायची होती. ‘ तिच्या अंगांत गरम कांहीं तरी आहे कीं नाहीं ? ’ पण तें नव्हतं अन् माझ्या अंगांत मात्र होतं.

कां कोण जाणे ! पण मला उगीच शरमल्यासारखं झालं. तिच्या ·पेकडे पहातां तिला ऊबदार वस्त्राची खरी गरज होती. गरजवंताला ·ाये अन् माझ्यासारख्या धडधाकट माणसानें जिवाचे चोचले करावे,

ही काय चांगली गोष्ट आहे ! अटकर बांध्याच्या या लवंगलतेला स्वेटरसाठीं चार औंसांपेक्षां अधिक लोकर खात्रीनें लागली नसती. बायका दुसऱ्याचं सुख अधिक पहातात अन् स्वतःकडे दुर्लक्ष करतात, ही माझी नेहमींचीच तक्रार आहे. घरांत मी पुष्कळ वेळां तोंड वाजवतों तें याच मुद्यावर. हिचा नवरा काय स्वेटरशिवाय कामावर जात असेल ! अन् हिचीं मुलं——

हो, मुलंच. आतां ही सहा–सात महिन्यांची गर्भारशी दिसते; पण हिचं हें पाहिलं गर्भारपण खास नव्हे. पहिलटकरीण चारचौघांत वावरतांना कशी संकोचते ! जशी सूर्यास्तानंतरची कमलिनीच. कोणी आवर्जून तिच्या वाढत्या देहाकडे पाहिलं कीं तिची मान अळवाची देठी होते. पण हिच्याकडे तसली अपूर्वाई कांहीं उरली नव्हती. ती निःसंकोच उभी होती अन् निःसंकोच सगळीकडे पहात होती.

पांच मिनिटं गेलीं, दहा गेलीं, पंधरा गेलीं, तरीहि आम्ही तिथें वईचे खुंटच. आमची उत्कंठा आतां तुटण्याच्या बेताला आली होती. त्या जन-रहाटींत आमचं दोघांचंच जणूं सुखदुःख एक होतं. तिलाहि लवकर जायचं होतं अन् मलाहि. अन् तेंसुद्धां एकाच बसमधून. दोघांच्याहि चुळबुळीवरून तें समजून येत होतं. मला कसली घाई आहे हें तिला ठाऊक नव्हतं. अन् तिची घाई तरी तिनें मला कुठं सांगितली होती ? पण माणसाला एक तर्क नांवाची शक्ति देवानं दिली आहे ना ? तिच्या साह्यानें मी तिचा जीव कशांत टांगला असेल तें समजूं शकत होतों. तिच्या हातांतल्या पिशवींत वरच नवलकोलाचे दोनतीन गड्डे होते. म्हणजे ही आतां घरीं जाऊन त्यांची भाजी करणार अन् मग नवऱ्याला वाढणार. तो कचेरीला जाणारा कारकून असला तर त्याची वेळ चुकणार. अशा वेळीं तो काय हिच्यावर डोळे तांबडे केल्या-शिवाय राहील ! एका बाजूनें नवऱ्याची पुष्पांजलि अन् दुसऱ्या बाजूनें पोरांची काव काव. मग ही खट्टू होऊन दुःखं अन् शितं कालवून

खाणार. छे: ! भलत्याच वेळीं कशाला आली ही मंडईत ! पण एवढ्यानेंच काय झालं आहे ! हिच्या त्या दुसऱ्या पिशवींत कापडं दिसतात. म्हणजे भाजीखरेदी अन् कापडखरेदी एकाच खेपेंत आणि तीहि सकाळच्या ऐन धांदलीच्या वेळांत. संध्याकाळ नसती का हिला मोकळी मिळाली ?

" आज सगळ्या येणाऱ्या गाड्या वाटेंतच थंडावल्या वाटतं—" मी सहज तिच्याकडे पाहून म्हटलं. त्यावर तीहि म्हणाली.

" पहा ना ! जाणाऱ्या गाड्या एकामागून एक चालल्या आहेत. पण येणारी मात्र एकहि नाहीं. "

" यालाच म्हणतात दैवाची उलटी गति ! नको असेल तें पाठीस लागतं अन् हवं असेल तें अडून बसतं. "

सहजगत्या मी जें हें तत्त्वज्ञान बोलून गेलों तें तिच्या जिवाला लागलं कीं काय कोण जाणे ! वस्तुतः यावर एखाद्यानें स्मित करायचं; पण तिनें तें केलं नाहीं. उलट तिच्या डोळ्यांचीं साळकं मात्र कोमेजल्यागत दिसलीं. अन् मग माझा मीच खजील झालों. एवढ्यांत तांबडा रंग पलीकडच्या थांब्यावर दिसला. आम्ही दोघंहि थोडीं पुढें सरसावलों. बस येऊन आमच्यापुढें थडकतांच मी तिला म्हटलं, ' तुम्ही चढा आधीं. '

मी जरी तिच्या आधींचा उतारू असलों तरी एवढं दाक्षिण्य मला दर्शवणंच भाग होतं. माझ्यापेक्षां तिची घाई मला विशेष जाणवत होती. तिचा तो रागावलेला नवरा...तिचीं मुलं...त्यांची जेवणाची वेळ...

दोन्ही हातांतल्या अवजड पिशव्या सांवरीत ती कष्टानेंच वर चढली. डाव्या हाताची पहिलीच जागा तिला मिळाली. पाठोपाठ माझ्याबरोबरच आयत्या वेळीं धांवत आलेले आणखीहि कांहीं लोक चढले. पण आम्हांला बसायला जागा नव्हती. तिच्यापुढें तिच्या पायांना खेटून पुरुषांची एक भिंत उभी झाली. पिशव्या खालीं ठेवल्यामुळें मोकळ्या झालेल्या हातांनीं तिनं आपला पदर नीट केला. ऊरपोट झांकून घेतलं. एवढा वेळ शिणलेले

तिचे हात मांड्यांवर विसावले. किती बारीक, किती नाजूक ! नखं आरक्त गुलाबी नव्हतीं; पण बोटं सुंदर निमुळतीं होतीं. तोंडसुद्धां लहानसर अन् त्याला साजेशीच जिवणी. पापण्या विरल; पण लांब अन् वरच्या बाजूला थोड्या अधिक वळलेल्या. डोळे एखाद्या तपस्विनीचे. श्रांत पण चमकदार. मला आपलं सहज वाटलं कीं भाद्रपदांत हरताळका म्हणून हिला चौरंगावर बसवायला कांहींच हरकत नाहीं.

पण त्या तनूवर सुवासीनपणाची छटा मात्र कुठेंच दिसत नव्हती. तिच्या अवयवांतला रस रोज कुठेंतरी पिळून घेतला जात असावा. कोण हा शोषक ? नवरा...मुलं......का पोटांत वाढणारा गर्भ ? कोणी असो; पण तो जें कर्म आचरीत होता, तें नृशंस होतं यांत शंका नाहीं.

एवढ्यांत गोखलेस्मारकमंदिर आलं. एक माणूस उतरला अन् तिच्या शेजारींच मला जागा झाली. बसल्याबरोबर वळून आम्ही एकमेकांकडे पाहिलं. माझ्याबरोबरच तिच्याहि कुंदकळ्या क्षणैक चमकून लपल्या. ती जरा अधिक सांवरून बसली. मीहि जरासं अंग चोरलं. कंडक्टरनं समोर येऊन चिमटा वाजवतांच एक आणा त्याच्या हातावर ठेवून तिनें म्हटलं, ' लकडीपूल. '

लकडीपूल यायला दोन मिनिटंसुद्धां लागलीं नाहींत. ती उतरली. जातांना तिनें माझ्याकडे एक स्मितप्रभा टाकली नसती तर मी तिला कृतघ्न म्हटलं असतं का ? कोण जाणे ! ती उजव्या हाताला पोलिसचौकी-वरून जाणाऱ्या रस्त्याला वळली. ती जवळपास कुठल्या घरांत शिरते का तें मी पहात होतों. तिचा नवरा तिची प्रतीक्षा करीत दारांत उभा आहे कीं काय अन् असल्यास त्याची सिंहमुद्रा आहे का व्याघ्रमुद्रा आहे तेंहि मला पहायचं होतं. पण त्याआधींच आमच्या बसनें लकडीपुलाचा मध्य गांठला होता.

ती कोण हें मला माहीत नव्हतं. माहीत होण्याचा संभवहि नव्हता.

लोकगंगेच्या प्रवाहांत दोन काड्या एकत्र आल्या अन् दुसऱ्या क्षणाला पांगल्या एवढाच त्या गोष्टीचा अर्थ होता. जीवनाच्या धकाधकींत आपल्या माणसांचाच विचार करायला जिथें वेळ पुरत नाहीं तिथें आगंतुकांची काय कथा! पण तिच्या बाबतींत तसं झालं नाहीं. कां कोण जाणे; पण तिची सोशिक, शांत मूर्ति पुढें बरेच दिवस माझ्या मनःपटावर वावरली अन् मग पुसट पुसट होत केव्हां तरी अदृश्य झाली.

  

पण व्यवहारांत असे कांहीं अभोगत प्रसंग येतात कीं, पुसलेलीं चित्रं पुन्हां उमटावीं. विस्मृतींतले विषय पुन्हां जागे व्हावे. अन् मग जिवाला बेचैन व्हावं. त्या दिवशीं मोठ्या सकाळीं उषेनें पूर्वक्षितिजावर आपले गुलाब फुलवायच्या आंत मी पर्वतीची टेकडी चढलों. रीतीप्रमाणें सगळ्या देवांना वंदन केल्यावर उगवत्या बालरवीचं दर्शनहि मी तिथूनच घेतलं. वैशाखाच्या उष्ण दिवसांत पाण्याची जवळीक सुभग असते; तेव्हां म्हटलं, टेकडीच्या दुसऱ्या पालथणानें खालीं कालव्याच्या जवळ उतरावं. पुलावरून मी कालव्याच्या पलीकडच्या कांठावर गेलों. आतां उजव्या बाजूला वळून पुन्हां मुख्य रस्ता गांठायचा तों डाव्या हाताला एका पोराचं किंचाळणं ऐकूं आलं. सहज नजर तिकडे वळली. पहातों तों थोड्या अंतरावर एका झुडपाशेजारीं मायलेंकरं उभीं. आईनें मुलाचं डोकं डाव्या हातानें गच्च धरून मागें वांकवलं आहे अन् उजव्यां हातानें ती त्याच्या डोळ्यांशीं कांहीं तरी करीत आहे.

मी जवळ गेलों तरी तिला उमगलं नाहीं. त्या मुलाच्या गालांवरून ओघळ वहात होते. नाकपुड्या मोकळ्या झाल्या होत्या. त्याचे डोळे आले होते अन् चांगलेच सुजले होते. त्या नेत्ररोगानें पोराचा चेहरा बघवत नव्हता. आई त्या झुडपाचीं पानं चुरगळून त्याचा रस पोराच्या डोळ्यांत घालीत होती. पोराला तो झोंबत असावा. कारण तें ओरडत

होतं, नाचत होतं अन् सर्व शक्ति पणाला लावून आईचा प्रतिकार करीत होतं. आणि त्यामुळें आई चिडून त्याला अधून मधून धम्मकलाडू चारीत होती.

मला तो प्रकार अमानुष वाटला. गांवांतले डॉक्टर–वैद्य काशीयात्रेला गेले का स्पेशालिस्ट नेत्रवैद्यांनीं संन्यास घेतला ? सुधारणेच्या या युगांत असले रानटी प्रकार करणं म्हणजे—

" हें काय आरंभलं आहे तुम्ही ? पोराला जन्माचा आंधळा का करायचा आहे ? " मी म्हटलं.

हा कोण शहाणा उपटला अशा दृष्टीनें तिनें माझ्याकडे वळून पाहिलं. आणि कांहीं क्षण ती पहातच राहिली. मी मनाशीं म्हणालों, ' हिला मी कधींतरी पाहिली आहे काय ? कधीं ? कुठें ? ' मनानें भूतकाळाचा तळठाव घेतला, जरा वेळ धांडोळलं अन् इतिहासाचं एक नोंदलेलं पान माझ्यापुढें धरलं.

" थंडीचा कडाका. सेवासदनाचा कोपरा. बससाठीं थांबलेली गोरी अन् नकसूद स्त्री. सात महिन्यांची गर्भारशी......"

' शंकाच नको. तीच ही. पण हें मूल मात्र त्या खेपेचं नव्हे. तें फार तर वर्षाचं असेल. हिला आधींचीं मुलं असलीं पाहिजेत, हें मी त्या वेळीं म्हटलं होतं तें खरं उतरलं. ' मी त्या मुलाला न्याहाळूं लागलों. तो हाड-कुळाच होता; पण त्याचं हाडपेर मोठं होतं. चेहरा थबकट, साधारण चौकोनी. वर्ण कृष्णाचा. जिवणी रुंदट. तो मातृमुखी नव्हता. अर्थात् पितृमुखी असला पाहिजे हें ओघानेंच आलं. त्याच पोराची प्रतिमा मोठी करून कल्पनेनें मी त्याच्या बापाला पुढें उभं केलं. मला त्याच्या सामुद्रिक लक्षणांवरून त्याचा स्वभाव अजमावायचा होता. त्याचं अन् हिचं कसं काय बनत असेल त्याचा तलास लावायचा होता. थोड्याच क्षणांत माझ्या मनानें निर्णय दिला.

' हिचा नवरा कसा आहे सांगूं ? घायकुत्या. एककल्ली. स्वतःचं सुख अधिक पहाणारा. अन...अन......कदाचित बेजबाबदार...'

नाहीं तर या पोराचे डोळे या थरावर गेले नसते. नाहीं तर ही बाई असलीं रानटी औषधं करायला निघाली नसती. माझं हें विचार-चक्र फिरून मूळपदावर आलं तरी ती माझ्याकडे पहातच राहिली होती. सकाळीं उषेचं आरक्त मुखमंडल मी पाहिलं होतं. आतां हिचंहि तसंच पहात होतों. उषेची लाली अनुरागाची होती. अन् हिची रागाची होती एवढाच काय तो फरक. मला वाटलं कीं, ही आतां मला चमकावणार—

" नसता चोंबडेपणा कशाला करतां ? जा कीं सरळ आपल्या वाटेनें—"

पण तसं कांहीं झालं नाहीं. तितका तुसडेपणा तिच्या अंगीं नसेल किंवा कदाचित् तिला आपल्या निष्ठुरपणाची शरम वाटली असेल. .

" जन्माचीं दावेदार होऊन आलीं आहेत हीं पोरं. ' पाटी येईन, पोटा येईन पण छळीन ! ' वाड्यांतल्या इतर मुलांचे डोळे नाहीं का बरे झाले ! ' पण हींच मेलीं क्रेशी—"

अर्धवट स्वगतच ती हें बोलली. गेल्या वर्षी प्रथम मी तिला जशी पाहिली तशीच ती आजहि दिसत होती. तेवढीच अंगकाठी अन् तोच फिकटपणा. मला वाटलं, इतक्या दिवसांनंतर तरी ही थोडीशी कां सुधारूं नये ! हिला सकस अन्न मिळत नसेल किंवा खातां जेवतां डोक्यावर तलवार तरी टांग-लेली असेल. मी पुन्हां एकदां तिला आपादमस्तक निरखली. तिची डावी-कडची कंबर लाल झाली होती. लुगड्याचा तिथला भाग चोळवटला होता. खात्रीनें हिनें या पोराला कडेवरून आणलं असलं पाहिजे. लकडीपुलाकडून पर्वतीच्या पायथ्यापर्यंत एवढं ओझं आणायचं म्हणजे—माझं चित्त विरमलं.

" अशानें नाहीं याचे डोळे बरे व्हायचे. डॉक्टरकडे नेऊन कांहीं दिवस पद्धतशीर उपचार करायला हवेत. ससूनमध्यें माझा एक डॉक्टर मित्र आहे. मी तुम्हांला थोडीबहुत मदत करूं शकेन. "

तिनें उत्तराऐवजीं माझ्यावर दृष्टि रोखली.

तिच्या दृष्टीवरून, तिच्या मुखमुद्रेवरून त्या पहाण्यांत ढीगभर अर्थ असला पाहिजे याची मला खात्री झाली. ' तुम्ही कोण ? तुमचा माझा काय संबंध ? कां एवढा तुम्हाला एकाएकीं परोपकाराचा पान्हा फुटला ? असल्या या मदतींतला भावार्थ मला चांगला कळतो—'

दुर्दैवानें पाठ पुरवली असून सुद्धां ज्यांचं स्वत्व शाबूद आहे, ज्यांचा आत्मा जागृत आहे, अशीं माणसं अधिक सावध असतात. आपल्या मदतीसाठीं म्हणून पुढें होणारा हात न कळत आपल्या वर्मावर कुऱ्हाड तर घालणार नाहीं ना, असं त्यांना पदोपदीं वाटत असतं. मिंधेपणा येईल असे उपकार प्राण गेला तरी तीं स्वीकारणार नाहींत. अशा कांहीं दुर्दम्य व्यक्ती माझ्या परिचयाच्या होत्या आणि म्हणूनच तिच्या त्या दृष्टींतली खोंच मला कळूं शकली: पण मीहि न कचरतां तेवढ्याच आत्मविश्वासाच्या शब्दांत तिला म्हटलं.

" तुमची माझी ही कांहीं पहिलीच ओळख नाहीं. पहा तुम्हाला आठवत असेल तर. वर्ष दीड वर्षांपूर्वीं तुम्हीं जड जिवाच्या असतांना मी तुम्हाला बसच्या थांब्यावर पाहिलं होतं. तुमच्याशीं चार शब्द बोललोंहि होतों. त्या वेळीं तुमच्याकडे पाहून न कळत माझ्या अंतरांत कोवळीक निर्माण झाली होती. त्या वेळी तुमची मला कांहीं माहिती नव्हती अन् आजहि नाहीं; पण तुमच्याविषयीं त्या कांहीं दिवसांत मी खूप विचार केला होता. आज तुम्ही अचानक दिसलांत. ती पूर्वस्मृति एकदम जागी झाली—"

तें पोर डोळे मिचमिचावून मला बघण्याचा प्रयत्न करीत होतं. कदाचित् मी त्याला देवासारखा वाटलों असेन. कारण मी तिथें पोंचल्यामुळें त्याचा पाठींतला खुराक थांबला होता. तो जीवघेणा नेत्रोपचारहि थांबला होता. तिनें तर माझं बोलणं ऐकतांना डोळ्यांचीं कमळं शक्य तितकीं फुलवलीं होतीं. इतर ज्ञानेंद्रियं स्तिमित होऊन सगळं चैतन्य तिच्या दृष्टींत एकवटलं होतं. मी माझं बोलणं चालूंच ठेवलं होतं.

" मी कोण, कसा हें तुम्हांलाहि माहीत असण्याचा संभव नाहीं. स्त्रियांच्या दृष्टीला पुरुषांच्या अंतरांतलं किल्मिष लपत नाहीं या गोष्टीवर माझा विश्वास आहे. तुम्ही माझ्याकडे नजर रोखलीच आहे. पहा, मी तुमच्या विश्वासाला पात्र ठरतों का ! तसं झालं तर मला खूप आनंद होईल. मी कांहीं भेटेल त्या कष्टी जीवाला मदत करण्याचं सदावर्त उघडलेलं नाहीं. तसा मी ' कर्णदानेश्वर'हि नाहीं; पण एखाद्या व्यक्तीकडे मनाची पाकळी वळते अन् तिच्यासाठीं आपल्या हातून कांहींतरी घडावं असं वाटतं. बस्स ! एवढंच. "

ती वरमली. तिनें चटकन् आपली मान वळवली. तिनें दाखवले नाहींत; पण तिच्या डोळ्यांत अश्रू जमलेले मला दिसले. ते पुसण्यासाठीं तिच्या करांगुलींनीं पदराचं टोंक वर नेलं. तिच्या मुद्रेवरचे भाव पालटले. क्षणभर ती अशरण, अगतिक अशी मला दिसली. वाटलं कीं आतां ही आपलं मन मोकळं कळणार. भूत अन् वर्तमान यांचा पट आपल्यापुढें खोलणार. हिच्या या हृदयांत किती दुःखं, अन् यातना भरलेल्या असतील कोण जाणे ! तें कालकूट आतां खवळून, ढवळून बाहेर निघेल अन् शंभु होऊन तें आपल्याला घ्यावं लागेल.

पण माझी ही अपेक्षा खोटी ठरली. ती आकारानें बाहुली होती खरी; पण कापराची नव्हे; तर संगमरवराची. आपल्या पाघळणाऱ्या वृत्ती किती निग्रहानें तिनें बंदिस्त करून टाकल्या ! पहिल्या क्षणाला गंगा अन् दुसऱ्या क्षणाला दुर्गा अशीं तिचीं दोन्ही रूपं मी पाहूं शकलों. ती मग तिथें जरा सुद्धां थांबली नाहीं. तिनें पट्कन मुलाला उचलून कडेवर घेतलं अन् माझ्याकडे पाठ फिरवली. तो कालवा–ती लहानशी सरिता उजव्या बाजूनें संथ गतीनें चालली होती अन् तिच्या कांठानें ही जीवनसरिता जड पावलांनीं चालत होती. तिचा उगम आणि पर्यवसान हीं दोन्ही मला ठाऊक होतीं; पण हिच्या या दोन्ही गोष्टी मला अज्ञात होत्या. तिचं पाणी कांठाला

बिळं पडून बाहेरच्या बाजूला झिरपत होतं. पण हिनें मात्र आपल्या जीवनाचा एक टिपूसमुद्धां बाहेर येऊं दिला नव्हता. तिच्या संयमाला धन्यवाद द्यावे कीं आपण तिच्या विश्वासाला पात्र न ठरल्याबद्दल आपलीच कींव करावी, हेंच मला कळेना.

* * *

त्यानंतर कांहीं दिवसांनीं मला सुरतेहून एका मित्राचं पत्र आलं कीं, मी अमुक दिवशीं पुण्याला येऊन नारायणपेठेंत अमुक ठिकाणीं उतरणार आहें, तिथें मला येऊन भेट. मी त्याप्रमाणें पत्ता शोधीत सकाळीं साडे-आठच्या सुमाराला तिथें दाखल झालों. वाड्यांत पाऊल ठेवतांना मला प्रथम दर्शन झालें तें तिचेंच. मी चमकलों. क्षणभर थबकून उभा राहिलों. ती बाहेर कुठें तरी निघाली होती.

" इथें रहातां तुम्ही ? " मी विचारलं.

" हो. तुम्ही कुणीकडे इकडे ? "

" याच वाड्यांत. एका मित्राला भेटायला. "

ती हसली. अकृत्रिम, प्रसन्न अन् निर्मळ. तिच्या नाजुक लालसर ओंठांत तें मावलं नाहीं. त्यावरून मी ताडलं कीं, बऱ्याच दिवसांनीं ती आज हंसली असावी. तिच्या हातांत शिवलेल्या कपड्यांची एक चवड होती. बहुधा तिनेंच ते शिवले असावे अन् ते पोंचते करण्यासाठीं ती गिऱ्हाइकाच्या घरीं जात असावी. पहिल्या भेटीच्या वेळीं मी तिच्या हातांत कापडाची पिशवी पाहिली होती तेंहि कापड गिऱ्हाइकाचंच असावं तर ! पोरांची इगानिगा करून हिला एवढं शिवणकाम करायला सवड मिळते तरी कशी ! का नवऱ्याची मिळकत अपुरी पडते म्हणून हिला असा देह कष्टवावा लागतो !

मी वाड्याचा दर्शनी चौक ओलांडून आंत गेलों. तिनें जरी आपलं बिऱ्हाड मला दाखवलं नव्हतं तरी तें मला दिसलंच. उजव्या हाताच्या

पहिल्याच खोलीच्या दारांत तो पोरगा दोऱ्याचीं रिकामीं रिळं घेऊन खेळत होता. अजूनहि त्याचे डोळे पिचापिचेच राहिले होते. सात आठ वर्षांची एक मुलगी दुसऱ्या एका लहानग्या मुलीला कडेवर घेऊन तिथेंच उभी होती. दोन्ही पोरी रेखीव, कांतीव, गोऱ्या बाहुल्या होत्या. जणूं आईच्या प्रतिमा. मुलींच्या तोंडावर अन् कपड्यांवर दैन्याचं नांवसुद्धां नव्हतं. आपल्या दुःखाची झळ तिनें मुलींना लागूं दिली नव्हती तर—

आणि तें पाहून माझ्या मनांत एक निराळीच प्रतिक्रिया सुरू झाली. 'ती खरोखरच दुःखी आहे का ? का हे सगळे माझ्या कल्पनेचेच खेळ ? तिच्या अंगाला मी जें दुःख चिकटवीत राहिलों आहे तें कोणत्या आधारावर ? पायावांचूनच मी इमला उभारला नसेल कशावरून ? '

मी तिथून पुढें व्हायच्या पूर्वीं आणखी एक शोधक नजर आंत टाकली. मला तिचा नवरा पहायचा होता. मला खरी तहान होती ती तीच. तो जर नुसता मला दिसला असता तरी मी, ती सुखी आहे का दुःखी आहे तें हमखास ताडलं असतं. पण तो मात्र आंत कुठें दिसला नाही. सकाळच्या वेळीं सुद्धा स्वारीनें घरीं असूं नये म्हणजे काय ?

माझा मित्र ज्यांच्या घरीं उतरला होता त्यांना मी धीर करून तिच्या नवऱ्याबद्दल विचारलं. पण ते म्हणाले, 'सवडीनें या. म्हणजे सांगेन तुम्हांला सगळं. '

* * *

पण योगायोग कांहीं निराळाच होता. तिच्या नवऱ्याची हकीकत मला खुद्द तिच्याच तोंडून कळायची होती. आणि तीहि अवघ्या आठ दहा दिवसांच्या अवधींत. रात्रीचे अकरा वाजून गेले होते. मी जिमखान्याकडे माझ्या घरीं जाण्यासाठीं मातीच्या गणपतीवरून झपाट्यानें निघालों होतों. रस्त्यांत रहदारी अगदींच तुरळक होती. विजेचे मंद दिवे कृष्णपक्षांतल्या अंधाराला भिवविण्याचा प्रयत्न करीत होते. एवढ्यांत समोरून येणारी एक

आकृति दिव्याखालीं आली. दुसरी कोण ? तीच. तिच्या खांद्यावर एक लहान मूल होतं तें बहुधा तिची धाकटी मुलगी असावी. तिचं लक्ष आजू-बाजूला नव्हतं आणि तीहि माझ्याप्रमाणेंच झपाट्यानें रस्ता कांपीत होती.

मला अवचित पुढें पाहून ती थबकली. तिला बरं वाटलं का वाईट वाटलं हें मला कसं कळणार ! पण तिनें एक दीर्घ उसासा सोडला हें मात्र मला समजलं.

" कोण, तुम्ही ? " मी अधीरपणें विचारलं. मलाहि कांहीं कमी आश्चर्य नव्हतं.

" होय, मीच ! " ती म्हणाली.

" कुठें निघालात अशा अपरात्रीं ? "

" माझ्या मैत्रिणीकडे. "

" एकट्याच ? "

" देवावर भार टाकला कीं तो प्रसंगीं सोबत उभी करतो. "

हे शब्द तिनें मलाच उद्देशून उच्चारले असावे असं मानायला जागा होती. या मानिनीला माझ्या अंतरांतला जिव्हाळा प्रतीत झाला असेल काय ? का वाटेच्या वाटसराचीहि मदत घ्यावी अशी एखादी नौबद हिच्यावर गुद-रली आहे ? मी संभ्रमांत पडलों.

" एकंदरींत काय प्रकार आहे हा ? "

" प्रकार कसला ? माझं दुर्दैव—"

" तें तर सदाचंच आहे तुमच्या जीवनांत. "

" पण आज तें घरांत घुसलं आहे. नवऱ्याच्या रूपानं. "

" म्हणजे ? "

" ते घरीं आले आहेत थोड्या वेळापूर्वी. "

" नवरा घरीं येणं हें दुर्दैव का सुदैव ? बायकांना तर त्याच्या रूपानें परमेश्वर आल्यासारखं वाटतं. "

" ज्या कोणी भाग्यवंताच्या गृहलक्ष्मी असतील त्यांना तसं वाटत असेल. पण मी तशी नाहीं. मी सधवा असून—"

" म्हणतां काय ! "

" होय. माझा नवरा भ्रमिष्ट झाला आहे. "

" वेडबिड लागलं आहे का ! "

" वेड नाहीं; पण माणसांतून उठण्याची एक नवी तऱ्हा. आज तीन वर्षं झालीं, त्यांनीं संसार सोडला आहे. पृथ्वीच्या पाठीवर कुठें तरी भटकत असतात. कधीं तरी चार सहा महिन्यांनीं तोंड दाखवतात अन् पुन्हां चालते होतात. आपल्याला मुलं आहेत का, असलीं तर तीं सगळीं जिवंत तरी आहेत का, आपली बायको त्यांना कशी पोसते, नीतीनें का अनीतीनें, धर्मानें का अधर्मानें, याची त्यांना काडीइतकीहि आस्था नाहीं. ते अगदीं मुक्त झाले आहेत या जंजाळांतून—"

" मुक्त का पशु तें कोण सांगणार ! "

मी चटकन् बोलून गेलों. मला त्या माणसाचा राग आला होता अन् त्या रागाच्या पोटींच जिभेवरचा ताबा सुटला होता. तिला ते शब्द बहुधा लागले असावेत. ती क्षणभर श्वास रोधून म्हणाली.

" कदाचित् पशूहि असतील. पण माणसासारखा माणूस पशु बनतो तो काय सुखासुखीं बनत असेल ! पुढची हकीकत ऐका अन् मग तुम्हींच ठरवा काय तें ! त्यांना एका कंत्राटदाराकडे नोकरी होती. पाऊणशें रुपये दरमहा मिळत. दहा तारखेपर्यंतच त्यांची वासलात लागत असे. त्यांची आई कोणाचीं बाळंतपणं, कोणाच्या अंगाला लावणं, असलीं कामं करी. पण ती पाठीला पोक लागून घरीं बसली. तशांत दोन मुलं झालीं. घरांत खातीं तोंडं वाढलीं. बाहेर महागाई उसळली. संसाराची सर्व बाजूंनीं ओढगस्त होऊं लागली. एकीकडे ठिगळ लावावं तों दुसरीकडे फाटायचं. म्हातारीजवळ थोडीशी माया होती, तिच्या व्याजांत तिचं रेशन अन् वर्षाचीं दोन लुगडीं एवढं भागायचं; पण

आईचा ओढा मुलीकडे वळला. एकच मातृहृदय; पण तें मुलीच्या बाबतींत पाझरलं अन् मुलाच्या बाबतींत आटलं. म्हातारीनें मरतेवेळीं आपली सगळी पुंजी मुलीच्या ओटींत घातली अन् आपले 'अकरा बारा' करायलासुद्धां चार पैसे मुलाच्या हातावर ठेवले नाहींत. यांच्या आशेचा मनोरा कोसळला. हा प्रपंचाचा गाडा यापुढें रेटणं अशक्य असं त्यांच्या मनानं घेतलं. त्यांनीं कंत्राटदाराला आपला पगार वाढवण्याबद्दल करुणा भाकली. पण त्याचा हात सैल झाला नाहीं. यांचा जीव उबला. हे घरांत अकस्ताळीपणा अन् कामावर चुका करूं लागले. कंत्राटदारानें आई-माई उद्धरायला सुरुवात केली. आणि अशा तडकलेल्या मनोवृत्तींत ते एक दिवस कामावर म्हणून गेले ते परत आलेच नाहींत."

"गाड्याचं एक चाक मोडलं तसा सगळा भार दुसऱ्या चाकावर येऊन पडला. बाप पळून गेला; पण आई कुठें पळणार! शतमुखांनीं खायला उठलेल्या संसाराला तोंड द्यावंच लागलं मला. हीं तीन वर्षें मी कशीं काढलीं त्याचं स्मरण झालं कीं कांटा उभा राहातो अंगावर. आंतून काळजी अन् बाहेर उपहास. गरिबानें स्वाभिमानानें राहिलेलं सोसत नाहीं जगाला. नाना प्रकारचे अनुभव काळजांत अगदीं ठेचून भरले आहेत...."

"तो कंत्राटदार एक दिवस घरीं आला अन् खूप पाघळला. म्हणे, 'हें बिऱ्हाड मोडून आमच्या घरीं चला रहायला. मी करीन तुमच्या मुलांचा प्रतिपाळ. इथें अन्न शिजवतां तें आमच्या घरीं शिजवा. दुसरं कांहीं करायचं नाहीं.' वर आणखी पंचवीस रुपये देत होता. मी ते परत केले अन् म्हटलं, 'आज जो तुम्हांला कळवळा आला तो त्यावेळीं आला असता, तर माझ्यावर हा प्रसंगच येता ना. जा तुम्ही. मी अन् माझं नशीब! पाहूं कसं काय होतं तें."

ती पुढें जात होती. मीं तिचा मागोवा घेत होतों. प्रकाशांतून अंधारांत अन् अंधारांतून प्रकाशांत. मधून मधून तें पोर तिच्या खांद्यावरून

घसरे अन् ती त्याला पुनः पुनः सांवरून घेई. तिचीं पावलं तुरुतुरु पडत होतीं. मधेंच ती थबके अन् माझ्याकडे वळून कांहीं मिनिटं बोलत राही. मग पुनः चालणं सुरू करी. ती अस्वस्थ झाली होती. तिच्या हृदयभूमीवर अनेक विरोधी भावनांचं द्वंद्व माजलं असावं. तिची मुद्रा उत्तेजित झाली होती. डोळ्यांत चमक उठली होती. मी लक्ष देऊन ऐकतों असं पाहून ती पुढें बोलूं लागली.

" चार आठ महिन्यांनीं कधीं तरी हे घरीं यायचे. पायांत वहाणा नसायच्या. अर्ध्या विजारीचीं लक्तरं लोंबत असायचीं. पोट पाठीस लागलेलं. छातीची शिंप झालेली. चेहऱ्यावर कळा नाहीं. केसांचं जंगल. प्रत्येक वेळीं मला वाटायचं, या खेपेस तरी सुधारून आले असतील. पश्चात्तापानें दग्ध होऊन परत प्रपंचाची धुरा वहाण्यासाठीं आले असतील. पण त्यांच्या भकास, शून्य नजरेकडे पाहिलं कीं सारा भ्रम फिटायचा. काय दैवाचे विचित्र खेळ ! बाप आला कीं पोरं घाबरून माझ्या मागें लपायचीं. वाड्यांतल्या मुलांनीं दारापुढें घोळका करून टिंगल करायची. बायकांनीं दारं-खिडक्या उघडून नजरा रोखायच्या. मी चिडून, संतापून त्यांच्यापुढें घरांत काय असेल तो भाकरी तुकडा आदळायचा अन् तो गिळून पुनः त्यांनीं चालतं व्हायचं. "

तिला आवेग आला होता. त्या भरांत सारखं ती बोलत राहिली होती. पण इतकं ऐकूनहि या वेळीं ती घराबाहेर कां पडली याचा मला उलगडा झाला नव्हता. मी भीतभीतच तो प्रश्न तिला विचारला.

" तुम्हांला नाहीं कळायचं तें. बायकांचीं हृदयशल्यं पुरुषांना आकळलीं असतीं तर ते मेणाहून मऊ झाले असते. पण देवानें तुम्हाला तें ज्ञानेंद्रियच दिलेलं नाहीं. जाऊं द्या तें ! एका खेपेला अचानक ते रात्रीं आले. मी गोंधळलें. माझं सावधपण चरायला गेलं. मी त्यांना आसरा दिला अन् ही पोरगी पोटीं आली. आजहि तोच प्रसंग होता. मला त्यांची भीति वाटली. त्यांना बाहेर काढणं माझ्या शक्तीच्या बाहेरचं होतं. तसं करायचं तर सगळ्या

वाड्याला जागं करावं लागलं असतं. त्यापेक्षां म्हटलं, आपणच एक रात्र बाहेर काढावी. ”

मी तिला मधेंच अडवून म्हटलं.

“ तुम्हांला राग येणार नसेल तर एक गोष्ट विचारतों. ”

“ विचारा कीं ! राग कसला त्यांत ? ”

“ अलीकडे प्रथा पडली आहे. कायद्यानेंहि मार्ग मोकळा करून ठेवला आहे. तुम्ही घटस्फोट—”

“ घुटमळलांत का ? पुढें बोला कीं. घटस्फोट...पुनर्विवाह...... बायकांच्या बहात्तर रोगांवर एकच रामबाण काढा. घटस्फोट अन् पुनर्विवाह— तुम्हांला वाटतं, एवढं केलं कीं बायका सुखी होतील. आनंदाच्या दोंदावर लोळत रहातील. तुमच्या या भ्रमाला हसावं कां रडावं तेंच कळत नाहीं. तुम्ही म्हणतां, मार्ग मोकळा झाला आहे. पण प्रत्येक मोकळ्या झालेल्या मार्गानें स्त्री धांवत सुटेल तर धाप लागून मरेल. स्त्रियांचीं दुःखं इतकीं सोपीं नाहींत. इतकीं उथळ नाहींत. ”

“ घटस्फोट ही एक सवलत आहे. नवरा क्रूर असला, दावेदार ठरला किंवा व्यसनाधीन बनून बायकोचं अन् पोराबाळांचं वाटोळं करायला निघाला तर तो आपद्धर्म स्त्रीनें स्वीकारावा. पण यांपैकीं एकहि दुर्गुण माझ्या नवऱ्या-जवळ नाहीं. तो फक्त भेकड आहे. आत्मविश्वासशून्य आहे. परिस्थितीसमोर त्यानें कच खाल्ली एवढाच त्यांचा दोष. अशा वेडपट अवस्थेंत अजूनहि त्यांच्या अंतःकरणांत कुठें तरी प्रेमज्योत लुकलुकते. घरीं येऊन ते कोपऱ्यांत भिंतीजवळ बसले कीं, तासन् तास माझ्या हालचाली न्याहाळीत रहातात. अधूनमधून आंवढा गिळतात. त्यांच्या डोळ्यांतल्या बाहुल्या कमालीच्या स्निग्ध अन् सौम्य होतात. तशा स्थितींत त्यांच्या उध्वस्त झालेल्या मनो-भूमींत कोणत्या भावनांची हिरवळ उगवत असेल ती त्यांची त्यांनाच माहीत. माझ्या अंतःकरणाचे बांध फुटतात अशा वेळीं. असं वाटतं कीं यांना आतां

जाऊं देऊं नये. मायेची शाल घालून त्यांना घरट्याच्या उबेंत ठेवावं. जशीं माझीं तीन पोरं तसंच हेंहि एक नेणतं लेकरूं."

" पण व्यवहार डोळ्यांपुढें उभा रहातो अन् हे सगळे भावनिर्झर कोरडे पडतात. एक खाणारा जीव वाढेल. एका निकामी जिवाची उस्तवारी करतांना पोरांची आबाळ होईल. अन् एवढ्यावरच भागलं आहे? नव्या आपत्ती, नवीं संकटं, यांनाहि मग टाळतां येणार नाहीं. यासाठीं त्यांना मी घरांतून बाहेर काढतें. किती स्वार्थी, किती कठोर आहें मी..."

अंतरींच्या उमाळ्यानें तिच्या ओठाची पाकळी थरथर हालूं लागली अन् ती दांतांखालीं दाबून धरतांना सहजच तिचं बोलणं खुंटलं. आतां मला थोडा अवकाश मिळाला. मी आत्मसमर्थनासाठीं तिला म्हटलं.

" माझ्या मघांच्या बोलण्याचा गैरसमज करून घेऊं नका. तुमच्या मागच्या हा ससेमिरा कायमचा सुटावा म्हणून मी तो मार्ग तुम्हांला सांगितला. "

" नाहीं हो ! तेवढ्यानें सुटायचा नाहीं तो. मी त्यांच्या विवाहबंधनांतून कायद्यानें मोकळी झालें तरीहि ते घरीं यायचे थांबणार नाहींत. कायद्याचा प्रकाश डोक्यांत पडण्याइतकी त्यांची बुद्धि ठिकाणावर आहे कुठें ? ते फक्त मला ओळखतात अन् तेंहि आपली बायको म्हणून ओळखतात. मग मी काय करायचं ? पोलिसांचीच मदत घ्यायची ना ? त्यांना येरवड्याचीच हवा दाखवायची ना ? नाहीं माझ्याच्यानं व्हायचं तें. मला त्यांचा सांभाळ करतां आला नाहीं तो नाहींच. मग कुठें तरी ते स्वतंत्रपणें जीव जगवतात, स्वच्छंदानें हिंडतात, त्याच्याआड तरी मी कां येऊं ! "

तिचा स्वर हळू हळू खालीं आला आणि ती बोलायची थांबली. मला आतां नुसते तिचे पदाघात अन् पायांत घोटाळणाऱ्या लुगड्याची खस् खस् तेवढी ऐकूं येत होती. कृतीचा भक्कम आधार असलेले तिचे बोल माझ्या

मनावर वेगळाच कांहीं तरी परिणाम करून गेले होते. ते विरले होते तरी अंतरांत अजून 'पडिसादाचीं उत्तरें' उठत होतीं. दोन हात अंतर ठेवून पुढें चालणाऱ्या त्या ठेंगण्या आकृतीची उंची मला मोजतां येत नव्हती. तिच्या जवळिकेंत, गंगास्नान केल्यासारखं मनाला पुनीत वाटत होतं. शनीच्या पारावरून मंडईच्या रस्त्याला वळल्यावर ती एका घरापुढें थांबली.

"मला इथंच जायचं आहे. इथेंच रहाते माझी मैत्रीण."

मी थांबलों. पायऱ्या चढून तीहि उभी राहिली.

"तुम्ही जा आतां. माझ्यासाठीं तुम्हांला खूप तसदी पडली."

तरीहि माझे पाय हालेनात. अन् मी पाठ वळवल्याशिवाय ती कशी घरांत जाईल ?

"मी आणखी एक गोष्ट विचारूं का ?"

"परवानगीच का घ्यायला हवी !"

"पडल्या प्रसंगीं माझ्या हातून होण्यासारखी असेल तेवढी मदत घ्याल ? निःशंक मनानें मला हाक माराल !"

"कां मला असं लाजवतां ? मी भवसमुद्रांत गटंगळ्या खातें आहें. बुडत्याला काडीचासुद्धां आधार पुरतो. अन् तुम्ही तर..."

पुढें तिला बोलवेना. तिची अवस्था अनावर झाली. मला हातानें जाण्याची खूण करून ती चट्कन आंत शिरली.

मला कोणी तरी हिमाचलाच्या शीतल, रुपेरी शिखरावर चढवल्यासारखं वाटलं. ती संकटांत होती. आज तर विशेषच ! पण माझा आत्मा कां फुलला होता ? तिच्यावर उपकार केल्याच्या अभिमानानें ? नाहीं. त्या मानधन कुलवतीनें माझ्यावर विश्वास ठेवला, माझं अंतरंग ओळखलं म्हणून !

---

# नवऱ्याची जात २

सरत्या फाल्गुनांतल्या ऐन रणरणत्या दुपारीं प्रभा अचानक माहेरीं आली. तिला कोणी आणायला गेलं नव्हतं, कोणी बोलावणंहि धाडलं नव्हतं. ती अनाहूतपणें आली होती. तिचा नवरा घनश्याम यानं तिला बेतीच्या धक्क्यावर मोटारींत बसवून दिलं होतं. वाळपईला उतरल्यावर ड्रायव्हरनें तिला एक गडी पाहून दिला होता. तिचं माहेर तिथून अर्ध्या कोसावर होतं. आपलं गांठोडं गड्याच्या माथ्यावर देऊन ती वाट चालूं लागली होती. तिच्या पायांच्या 'डोकल्या' तिठून पडत होत्या. समोरून वाऱ्याची झुळूक आली तरी तिला आपण उडून जाऊं कीं काय असं वाटत होतं. त्या अर्ध्या कोसाच्या प्रवासांत तिला एक नदी ओलांडायची होती. नदीला पाणी जेमतेम गुडघाभरच होतं, पण तेवढ्यांतून पैलपार व्हायला तिला गड्याचा हात धरावा लागला होता. पुढें तिची वाट कुळागरांतून जात होती. माहेराच्या आधीं तिला तिथल्या पोफळींनीं सावली दिली होती. त्यानंतर तिला घर दिसलं होतं. घराजवळचा पाण्याचा ओझर दिसला होता. पुढें अंगणांतला मांडव दिसला होता. आणि त्यानंतर बाहेर काकबळि टाकायला आलेले वडीलहि दिसले होते. पण—

माहेर पाहून मुलींच्या हृदयांत जो हर्ष उचंबळतो अन सगळ्या मुद्रेवर पसरतो तो प्रभेच्या तोंडावर दिसत नव्हता. ती निरुपाय म्हणून आली होती. घनश्यामानं लोटून दिली म्हणून आली होती. तो आतां महिना दीड महिना घरीं राहूं शकणार नव्हता. त्याला एका गांवांत नाटक बसवण्यासाठीं, त्याचं

संगीतदिग्दर्शन करण्यासाठीं जायचं होतं. गेल्या वर्षीचं त्याचं दिग्दर्शन त्या लोकांना अतिशय आवडलं होतं, आणि त्याच्यामुळंच नाटक यशस्वी झालं होतं. आणि म्हणून त्यांनीं यंदाहि घनश्यामाच्या सगळ्या अटी मान्य करून आर्जवानं त्याला बोलावलं होतं. निदान प्रभेला तरी त्यानं तसं सांगितलं होतं. त्यासाठीं आजारी प्रभेनं पणजीच्या बिऱ्हाडांत एकटी राहणं बरं नव्हे, हें तिला पटवून त्यानं आज तिची माहेरीं रवानगी केली होती. त्याच्या मनांत आणखी काय होतं त्याचा कोणाला थांगपत्ता लागणं शक्य नव्हतं. प्रभेलासुद्धां ती गोष्ट दुर्गम होती. त्यानं ‘ चल ’ म्हटलं, ती निघाली होती—आणि आतां माहेरीं दाखल झाली होती.

तिला पाहून बाप एकदम आश्चर्यस्तब्ध झाला. ‘ प्रभा! तूं? अन् एकटीच! ’ त्यानं विचारलं. प्रभेला त्या प्रश्नाचं उत्तर देण्याची या वेळीं तरी ताकद नव्हती. ती पडवीवर भिंतीला टेकून क्षणभर बसली अन् तिथेंच लवंडली. तिची आई घरांतून लगबगीनें बाहेर आली. मुलीला पाहून तिच्या अंत्रमाळा उडल्या. केवळ देहाचं काष्ठ घेऊन ती आली होती. देहबांध्याच्या मानानें तिच्या पोटऱ्या अधिक गोल अन् ठसठशीत दिसत. पण आतां त्यांतला कापूस झडला होता. तिच्या सांवळ्या मानेला एके काळीं केसांचा भला मोठा आंबाडा पेलत नसे. पण आज तिथें पोफळाएवढी गांठ लळलळत होती. तिच्या वाटोळ्या तोंडावर वाटोळेच तेजदार डोळे होते, पण आतां ते खोल गेले होते आणि त्यांच्या खालचीं काळीं वर्तुळं पहावत नव्हतीं.

आपण सोंवळ्यांत आहों हें विसरून प्रभेची आई तिच्याजवळ बसली. घामानं तिच्या गालांवर चिकटलेले केस तिनं प्रथम मागें केले. ‘ काय ग पोरी, तुझी ही दशा—’ हे तिचे भयकातर उद्गार ऐकून प्रभा किंचित् उठली आणि तिनं आईच्या अंगावर पडून तिच्या गळां मिठी घातली. त्यासरशी ‘ खुळ्ळ ’ आवाज करून तिच्या बांगड्या कोपरांत आल्या. तिला हुंदका आला होता, पण तो बाहेर फोडण्याइतकी ताकद मात्र नव्हती.

तिच्या मुक्या, कढत अश्रूंनीं तिच्या आधि–व्याधि थेट आईच्या गाभाऱ्या-पर्यंत नेऊन पोंचवल्या.

त्या माउलीच्या डोळ्यांपुढून प्रभेचा गेल्या पांच वर्षांचा जीवनपट हळूहळू सरकूं लागला. एक धडधाकट, रसरशीत मुलगी आपल्या मांडवांतून सासरीं जाते. सासरीं म्हणजे 'एकुनमुळ्यां' घनश्यामाच्या म्हापसें शहरांतल्या दोन खोल्यांच्या बिऱ्हाडांत. त्यानंतर वर्षादीडवर्षाच्या मुदतीनें आपण तिला पहिल्या बाळंतपणासाठीं घरीं आणायचे मनोरथ करतों. एवढ्यांत ती 'नासावते.' तिची सर्व प्रकारें आबाळ होते. दोन वर्षांच्या अवधींत पुन्हां तोच प्रकार घडतो. जांवई नाटक शिकवायला म्हणून गांवं भटकतो, तो महिनेच्या महिने घराचं तोंड पहात नाहीं. तिला एकटीला शेजाऱ्यांच्या सहानुभूतीवर दिवस कंठावे लावतात, आणि अशाच किती तरी जाचक, असह्य गोष्टी...

मुलीची मिठी सोडवून आई तिला घरांत घेऊन गेली. प्रभेचा बाप हें दीन दृश्य पाहून जिथल्या तिथें थिजला. दीड दोन वर्षांपूर्वी प्रभा अशीच अचानक अन् अशीच दुपारवेळची आली होती. त्या वेळीं तिच्या तोंडचं पाणी पळालं होतं खरं; पण शरीराला ताकद होती. घनश्याम ज्या एका आधि-काऱ्याच्या घरीं त्याच्या मुलीला हार्मोनियम शिकवायला जात होता, तिला त्यानें वादनाशिवाय आणखी कांहीं गोष्टी शिकवण्याचा प्रयत्न केला होता. त्या मुलीनें ओरड केली होती. सगळीं माणसं त्या खोलींत धावून आलीं होतीं. त्या आधि-काऱ्यानं प्रथम घनश्यामाचं थोबाड रंगवलं होतं अन् मग सरळ त्याला पोलि-सांच्या स्वाधीन केलं होतं. प्रभा त्याला सोडवूं शकली नव्हती. तिला करतां येण्याजोगी एकच गोष्ट होती अन् ती म्हणजे जन्मदात्याकडे धाव घेणं. तेवढं तिनं केलं होतं.

"हे आणखी गुण उधळलेन् का!" त्यानं कपाळाला हात लावून म्हटलं होतं.

" नाहीं हो दादा! जगाला काय हवं तें म्हणूं दे. पण तुम्हीं तरी असं बोलूं नका. ते तसे नाहींत. मला खात्री आहे. दादा, मला खात्री आहे. हें निव्वळ अदावतीनं रचलेलं कुभांड आहे. ती मुलगीच वाह्यात् आहे म्हणे. तिला वाटतं, विक्रमाच्या सिंहासनाच्या बत्तीस पुतळ्यांपैकीं आपण एक आहों. हेंच सांगत होते. यांनीं आपल्या बोटांतली विद्या तिच्या बोटांत घातली, त्याचे उपकार असे फेडते आहे..."

प्रभा किती विश्वासानं बोलली होती! घनश्याम दुसऱ्याचे असले नसले दोष किती बारकाईनं पहात होता तें तिला माहीत होतं. लोकांच्या मूर्खपणावर त्याचा कधीं उघड, कधीं प्रच्छन्न उपहास चाले तो तिनं ऐकला होता. हिणकस, अनैतिक गोष्टींबद्दल वेळींअवेळीं जगाची निर्भर्त्सना करणारा घनश्याम स्वतः तसलंच कांहीं तरी करील हें खरं मानायला प्रभा तयार नव्हती. आपलं शहाणपण आणि शहाजोगपण कितीदां तरी त्यानं तिला विशद करून सांगितलं होतं. पण तिच्या बापाला तें पटलं नव्हतं. तो तिला धुत्कारून म्हणाला होता—

" मला त्याचा निर्वाळा देऊं नकोस. त्याच्या बेछूटपणाला रडावं का तुझ्या मूर्खपणाला तेंच मला कळत नाहीं. "

बापाचे हे वैतागाचे बोल होते. पण करतो काय? मुलगी देऊन गुंतला होता ना! म्हापश्याला जाऊन त्याला त्या मुलीच्या बापाचे पाय धरावे लागले होते. एका अटीवर त्यानं घनश्यामाला सोडून देण्याचं मान्य केलं होतं— 'आजच्या आज घनश्यामानं इथून तोंड काळं केलं पाहिजे. पुन्हा या म्हापश्यांत तो दिसतां कामा नये.' आणि मग त्याच दिवशीं संध्याकाळीं घनश्यामानं पणजीचं तिकीट काढलं होतं. आपलं बिऱ्हाडबाजलं तिकडे उचललं होतं.

त्या दिवसापासून त्यानं घनश्यामाच्या भवितव्याची आशा सोडली होती आणि प्रभेची काळजी धरली होती. आपण हिरा म्हणून 'खुपेथर' दगड पदरांत बांधला याबद्दल त्याची खात्री झाली होती. मुलगा कलावान् आहे, चांगलं गातो, चांगलं वाजवतो, तेव्हां अन्न-वस्त्राला हाल काढायचा

नाहीं, चारचौघांत मानहि मिळवील या कल्पनेनं त्यानं घनश्यामाला मुलगी दिली होती. लोकांचीं नाटकं बसवतो यांत त्याला कांहीं वावगं वाटलं नव्हतं; पण त्यानं स्वतःच्या संसाराचं नाटक केलं तें त्याला पहावत नव्हतं. आणि विशेष म्हणजे, त्याला कांहीं सांगायचीहि सोय नव्हती. तो आपल्या सासऱ्याला विटीसारखा कोलून लावी. त्याचं स्मरण झालं कीं प्रभेच्या बापाचा आतांशा आत्मा जळे. पण प्रभेच्या देखत त्याला कांहीं बोलतां येत नसे. कोणी कांहीं त्याच्याविषयीं उणं दुणं उच्चारलं कीं प्रभा अगदीं कळवळे, त्याचा कैवार घेई अन् शेवटीं रडूं लागे. आणि म्हणून आतांसुद्धां पोरीची अशी दुर्दशा पाहूनहि त्याला आपला आवेग गिळून टाकणं भाग पडलं.

प्रभेच्या आईनं प्रथम तिला चार घांस खाऊं घातले आणि अंथरूण टाकून दिलं. सगळं आवरल्यावर तीहि येऊन मुलीच्या शेजारीं आडवी झाली. तिच्या अंगावरून हात फिरवीत ती म्हणाली.

" अग, तुझी ही अवस्था येईपर्यंत नवरा काय भांग पिऊन पडला होता का ? वेळींच औषधपाणी केलं असतं तर इतकं ' आगोळीं विख ' पोंचलं नसतं. पणजीला कोणी डॉक्टर–वैद्य होते ना ? "

आईच्या शब्दांनीं प्रभेच्या जिव्हाळीला शस्त्र लागलं. तिला वाटलं कीं आतां हिला, दादांना कसं पटवून देऊं ? या माणसांचा उगीच त्यांच्याविषयीं वाईट ग्रह झाला आहे.

" आई, त्यांनीं मला औषध दिलं नाहीं असं का वाटतं तुला ? जातील तिकडून पाळंमुळं सारखीं घेऊन येत. एकापेक्षां एक गुणकारी. पण मला त्यांतलं एकहि धारेना त्याला ते काय करतील ? डॉक्टरांवर त्यांचा काडीइतकासुद्धां विश्वास नाहीं. उगाच बाटलींत कसलं तरी पाणी ओतून देऊन पैसे खातात लेकाचे. कळत नाहीं मातीसुद्धां. त्या दिवशीं कोणी तरी मुंबईचा एक धन्वंतरि आला होता. यांच्या गुणांचं खूप कौतुक आहे त्याला. तो मला म्हणाला, ' यांच्यासारखं रत्न मुंबईला असतं तर तिथले लोक डोक्यावर घेऊन नाचले असते.

पिकतं तिथं विकत नाहीं म्हणतात तेंच खरं.' त्यानं मला नुसतं बघून यांना सांगितलं, 'तुमच्या बायकोला कसलाहि रोग नाहीं. अशक्त झाली आहे एवढंच. या खाऱ्या हवेंतून जरा डोंगरी हवेला जाईल तर आठ दिवसांत खडखडीत बरी होईल.' अन् म्हणून मला हे म्हणाले कीं, महिनाभर माहेरीं जाऊन रहा."

"ठीक झालं. पण घरापर्यंत तुला आणून पोंचवायला काय झालं होतं? का आमच्या तोंडावर नजर घालायची नाहीं? मुलगी देऊन आम्हीं गुन्हा केला आहे ना त्यांचा?"

"अग, ते आले असते; पण आज रात्रीं ललित नाट्यकलेचा खेळ आहे अन् यांनीं पेटी वाजवायला यायचं कबूल केलं आहे. त्यांचा पेटीवाला रजेवर गेला तर उभ्या गोव्यांत त्यांना यांच्याशिवाय दुसरा कोणी पसंत पडेना. मी त्यांना म्हटलं, तुम्ही येतां का घरापर्यंत? तर मला म्हणाले, आधीं कोणाला वचन देऊं नये अन् दिलं तर प्राण गेला तरी मोडूं नये—"

प्रभा दुबळ्या स्वरांत एवढं बोलली खरं; पण आईच्या मुद्रेवर पटल्याची रेषा कांहीं तिला दिसेना. त्यामुळें ती खट्टू झाली आणि मान फिरवून डोळे मिटून पडली. आईहि पुढें कांहीं बोलली नाहीं. तिच्या मनांत मात्र आलं, 'या नतद्रष्टानं पोरीला अगदीं मारून टाकलं आहे. इतके हाल भोगलेन्, शेवटीं मरायला टेकली, तरी अजून त्याचे गुण गाते आहे!'

प्रभेनं डोळे मिटले खरे; पण तिला झोंप आली नाहीं. तिच्या निमीलित दृष्टीसमोर घनश्याम उभा राहिला. तिला वाटलं, "माझं एक सोडा; पण यांची तरी तब्येत कुठें चांगली आहे? आपल्या दोघांना हल्लीं साडेसाती आहे असं हे सांगतात ती अजून किती दिवस भोगावी लागणार आहे, देव जाणे! त्यांच्याहि अंगांतलं रक्त कमी झालं आहे. अधून मधून तापहि आहेच. त्यांतच हीं नाटकांचीं जाग्रणं. जो येतो तो यांना शोधीत येतो. एका गांवीं गेले तर तिथून दुसऱ्या गांवचं बोलावणं कीं परस्पर तिकडे.

येत नाहीं म्हणाले तर म्हणे ओढून नेतात. यांचा हात पेटीवरून फिरूं लागला म्हणजे मोठमोठ्या गाणाऱ्या कलावंतिणीसुद्धां भुलून पडतात म्हणे. पडतील बाई; काय सांगावं ? यांचं मन खंबीर आहे म्हणून ठीक. मला नेहमीं म्हणतात, ' आमचं कलावंतांचं जिणं म्हणजे सुळक्या कड्यावरची वाटचाल. केव्हां तोल जाईल याचा नेम नसायचा. पण प्रभा, केवळ तुझ्या पुण्याईवर मी आजवर अनेक प्रसंगांतून वांचलों आहे. ' सकाळीं मला मोटारींत बसवून देतांना म्हणाले, ' तूं डोळ्यांपुढें नाहींस म्हणजे माझा जीव आतां टांगलेला राहील. आज रात्रीं मी नाटक तरी कसं वाजवणार आहे, देव जाणे ! मध्यम लावायच्या ऐवजीं पंचमावरच बोट पडायचं...' मी आतां माझी काळजी करूं का त्यांची ? मनांत उद्रेक आला, कांहीं बोलावंसं वाटलं तर कोणाजवळ मन मोकळं करूं ? यांचं नांव निघालं कीं आई—दादांच्या कपाळाला आंठ्या पडतात. यांनीं आग्रह केला म्हणूनच मी आलें. न पेक्षां माझं बरं वाईट काय व्हायचं तें त्यांच्या डोळ्यांपुढें..."

प्रभेचं शरीर पार्थिव होतं म्हणून तें भंगलं, ढांसळलं. पण तिची निष्ठा दिव्य होती, अपार्थिव होती. तिला कधीं एवढासुद्धां तडा गेला नव्हता. त्याच्या अनुपस्थितींत आणि उपस्थितींतसुद्धां तिनं हालतापच काढले होते. पीठ आहे तर मीठ नाहीं अन् मीठ आहे तर पीठ नाही. एखादे वेळीं पांचपन्नास रुपयांच्या नोटा तो तिच्या अंगावर फेकी अन् पुन्हा उचली. आणि मग तिच्या घरांत आठ दिवस दिवाळी होई.

गरम कोट, रेशमी शर्ट, केसाळ टोपी, गळ्याभोंवतीं लोकरीचा गळपट्टा, पायांत पंपशू, हा पोषाख धंद्याच्या दृष्टीनें आपल्याला करणंच भाग असं तो प्रभेला सांगे. तिला नेहमीं घरांतच रहायचं असे; त्यामुळं तिचं लुगडं फाटकं आहे कीं विटकं आहे हें कोण पहायला येणार ! प्रभेला कांहीं घ्यायचं सवरायचं असलं कीं तो तिला अगस्तिऋषीचे वायदे सांगे अन् तीहि न कुरकुरतां ते ऐके. ती म्हणे, ' माझी लाज त्यांना; नसलं घ्यायचं तर न

घेऊं देत ! ' तिचा एकच हट्ट असे अन् तो म्हणजे नाटकाला जाण्याचा. दुसऱ्या कुठल्या नव्हे; तर त्यानं शिकवलेल्या नाटकांच्या बाबतींत—' मी आज येणार आहें. मला न्याच. न्याल ना ? '

पांच दहा वेळां असा तिचा आग्रह पडला कीं मग आपली प्रतिष्ठा टिकवण्यासाठीं तरी त्याला एखादे वेळीं तिची लडिवाळी पुरवणं भाग पडे. मग कुठून तरी उधार उसनवार करून प्रभेला नवं लुगडं घेतल्यावांचून गत्यंतर नसे. प्रभेला त्या दिवशीं दुहेरी आनंद वाटायचा. एक नव्या लुगड्याचा अन् दुसरा ' मास्तर'ची बायको म्हणून नाटकाच्या मांडवांत इतमामानं प्रवेश करण्याचा.

भांग पाडलेल्या केसांवर तिरकी टोपी ठेवून, परीटघडीच्या कपड्यांवर विलायती अत्तराचा शिडकाव करून आणि दोन्ही भुवयांमध्यें तांबड्या गंधाची टिकली लावून तो पायपेटीच्या खुर्चीवर येऊन बसला अन् जरूर त्या खुंट्या ओढून त्यानं खर्ज सुरू केला कीं, त्या भरल्या नाट्यमंडपाचे डोळे त्याच्याकडे लागायचे आणि त्या क्षणीं प्रभेला आकाश ठेंगणं वाटायचं. नाटक पहाण्यापेक्षां ती त्याच्या बेटांतून निघणारी स्वरमालाच ' आ ' उघडून ऐकत रहायची. अशा गुणी पुरुषाची आपण बायको या अभिमानानं तिचं ऊर कांठोकांठ भरायचं. त्या वेळीं ती त्याचे मागचे शंभर अपराध सहज पोटांत घालायची. गुणी माणसं थोडींशीं छांदिष्ट अन् लहरी असायचींच, असं ती स्वतःच्या मनाला समजावयाची.

पण नाटकांत त्याच्या तालावर नाचणारे, संगीतांत त्याचा शब्द शिरसावंद्य मानणारे लोक खाजगी व्यवहारांत घनश्यामाला टाळतात, आपल्या घरांत विशिष्ट मर्यादेच्या आंत त्याला येऊं देत नाहींत, याची प्रभेला काय कल्पना ! आणखीहि बऱ्याच गोष्टींची तिला कल्पना नव्हती. घनश्याम भ्रमरवृत्तीचा आहे, नवीं नवीं फुलं शोधण्याचं आणि त्यांचा मकरंद लुटण्याचं त्याचं व्रत अविच्छिन्नपणें चालूं आहे, त्यांतच एक ' विषारी फूल ' त्याला भेटलं आहे,

त्याची त्याला बाधा झाली आहे, कांहीं दिवस त्या गोष्टीचा त्रास भोगून शेवटीं तो पणजीच्या एका प्रसिद्ध डॉक्टरकडे गेला आहे, डॉक्टरनं तपासणीच्या खोलींत नेतांच त्यानं डोळ्यांत पाणी आणून डॉक्टरांचे पाय धरले आहेत, डॉक्टर तेवढ्यावरूनच काय तें उमगले आहेत, त्यांनीं त्याला आडवा उभा तपासला आहे, एक 'टोचणी' देऊन वाटेला लावतांना घरीं 'संसर्ग' न करण्याबद्दल त्याला बजावलं आहे, अर्धवट बरा होतांच पूर्ण बरा झालों म्हणून त्यानं डॉक्टरचं घर वर्ज्य केलं आहे आणि......आणि...

पण या गोष्टी ब्रह्मदेवानं येऊन चार तोंडांनीं प्रभेला सांगितल्या असत्या तरी त्या तिला पटल्या नसत्या. जाग्रणांची उष्णता हें आपल्या विकाराचं निदान घनश्यामानं तिला सांगितलं होतं आणि तें ती खरं मानून बसली होती. आजच्या तिच्या शोचनीय अवस्थेला तोच कारण आहे हें ती कधींच कबूल करणार नव्हती. प्रभेसारख्या अजाण पोरीपासून सत्य लपवण्यासाठीं घनश्यामाजवळ भरपूर वाग्जाल होतं. पण प्रभेच्या आजच्या अवस्थेंत वाग्जाल निरुपयोगी होतं. आज प्रत्यक्ष कृति हवी होती. काळजीपूर्वक सेवा-शुश्रूषा हवी होती. आणि तें घनश्यामाच्या मनोवृत्तीला जुळण्याजोगं नव्हतं. त्याच्याजवळ 'माया' हि नव्हती अन् प्रेमहि नव्हतं. आणि म्हणूनच तो तिला माहेरीं ढकलून मोकळा झाला होता.

आज तरी प्रभेच्या रूपानें तिच्या आई-बापांच्या घरीं मूर्तिमंत आपत्ति येऊन थडकली होती. उघड्या डोळ्यांनीं तिची ती अवस्था बघणं त्यांना शक्य नव्हतं. रात्रीं त्या दोघांनीं 'पुढें काय' याचा विचार सुरू केला. 'पोरगी हाताला चढेल असं वाटत नाहीं' म्हणून आईनें डोळे ओले केले. प्रभेच्या बाबतींत आपली निवड फसली हें शल्य पुन्हा एकदां बापाच्या काळजांत सललं.

सकाळीं उठून त्यानं वाळपईची वाट धरली. तिथल्या एकुलत्या सरकारी डॉक्टराची मनधरणी करून त्याला घरीं आणलं. त्यानं तिला तपासून तिच्या बापाला एकांतीं सांगितलं कीं 'सभ्य, घरंदाज, कुलीन माणसाला जें होणं

लज्जास्पद तें हिला झालं आहे. ' या दुखण्याचा उगम कुठून असावा याचं डॉक्टरनं केलेलं अनुमान प्रभेच्या बापाला ताबडतोब पटलं. डॉक्टरनं कांहीं औषधं, इंजेक्शनं लिहून दिलीं. तीं सांखळीहून प्रभेच्या बापानें आणायचीं होतीं आणि डॉक्टरनं दोन दिवसांआड येऊन टोचायचीं होतीं. आपली ' संभावना ' खिशांत टाकून तो निघून गेला होता.

आतां हें असंच चालणार होतं. नव्हे, चालवायाला हवं होतं. त्यासाठीं पिशवीचं तोंड सैल करणं भाग होतं. पण प्रभेच्या बापाजवळ पिशवीच नव्हती, तर तो तोंड कशाचं सैल करील ? त्यानं झाल्या हकीकतीचं पत्र सविस्तरपणें घनश्यामला लिहिलं आणि पत्र नव्हे; तार असं समजून अमुक अमुक औषधं आणि इंजेक्शनं घेऊन येण्याविषयीं तीन तीनदां बजावून कळवलं. प्रभेला वाटलं कीं घनश्याम आतां गरुडारूढ श्रीहरि गजेंद्रमोक्षासाठीं धावून आला तसा धांवत येईल. ती दुसऱ्या दिवशीं वाटेला डोळे लावून बसली. बाहेर कोणाचीं पावलं वाजलीं कीं तोच आला असं समजूं लागली. आशा–निराशेचे धसके सोसूं लागली.

पण तीनदां सूर्य उगवला तरी घनश्याम उगवला नाहीं. प्रभेनं मग जिवाची समजूत केली कीं तो घरींच नसावा. पत्रच मिळालं नसेल तर तो येणार कसा ? प्रभेचा बापहि वाट पाहून थकला. त्यानं कल्पना नव्हे, तर खात्री केली कीं, हें अपसरण आमच्या अंगावर ढकलून तो नामानिराळा झाला आहे. बरं झालं तर आम्हाला श्रेय नाहीं. वाईट झालं तर आमचा डांगोरा पिटायला तयारी आहेच. प्रभा जगली काय, मेली काय, त्याला त्याची तमा नाहीं. अशा उद्विग्न मनःस्थितींत तो प्रभेच्या आंथरुणावर येऊन बसला अन् रुद्ध कंठानं तिला म्हणाला.

" पोरी, तूं बरी व्हावीस म्हणून जीव तळमळतो. पण पैसा कुठून उभा करूं ? तुझा नवरा हा असा. मला वाटतं, तुझ्या नांवानं आंघोळ करून तो केव्हांच कुठें तरी उधळला असेल—"

" दादा, कां तुम्ही उगाच त्यांची कूट खातां ? मी इथून चालती होऊं

का ? वाटेंत पडलें, मेलें तरी चालेल. माझ्या मागनं तुम्हाला काय बोलायचं असेल तें बोला. पाठीमागून राजाला ' रांडेचा ' म्हटलं म्हणून तो कुठें ऐकायला येतो ! मी आल्यापासून तुमचं पहातें आहे. तुम्ही त्यांना वेळीं अवेळीं घालून पाडून बोलतां आहां. मी नाहीं ऐकून घ्यायची—"

आणि प्रभेनं बायकांचं अस्त्र उपसलं. तें पाहून आई जवळ आली. तिनं नवऱ्याला नेत्रसंकेतानं गप्प रहाण्याबद्दल सुचवलं. तिनें मुलीचे फिकट गालांवरून वहाणारे आंसवांचे ओघळ टिपून काढले. ' मायेच्या पोटीं असं बोलणं येतं; तुला आवडत नसलं तर नाहीं आम्ही बोलणार–' म्हणून बापानं तिला आश्वासन दिलं. घनश्यामाच्या नादानपणाला निंदावं का पोरीच्या निष्ठेला वानावं, याचा त्याला संभ्रम पडला. त्याला वाटलं, मुलीच्या या निष्ठेला एखादं सत्त्वशील अधिष्ठान मिळालं असतं तर–!

प्रभेला थोड्याच वेळांत कळलं कीं आपल्या औषधपाण्यासाठीं आई आपल्या गळ्यांतल्या पुतळ्यांची 'गळसरी' फुंकायला तयार झाली आहे. तिला वाटलं, आपल्या पायीं आईला अशी 'मोकळी' करणं बरं नव्हे. आपल्या फणी-करंडयांत सोन्याच्या चार बांगड्या आहेत. त्यांपैकीं दोन दादांच्या हातीं देऊन त्या मोडायला सांगाव्या. यांतच आपली अन् आपल्या नवऱ्याची प्रतिष्ठा राहील. दोन बांगड्यांत बहुधा भागेल. दोन आपल्याला उरतील. पुरेत तेवढ्या. जमलं तर पुन्हा एकदां मागच्यासारखाच हट्ट धरून आणखी दोन करून घेईन.'

प्रभेला एकापरी बरं वाटलं. पण प्रत्यक्ष तें नग उचलून वडिलांच्या हातीं देतांना तिचा हात थरथरल्यावांचून राहिला नाहीं. जिवावरच बेतली म्हणून तिनं एवढं औदार्य दाखवलं. ' दागिना घडवायला वर्षे लागतात. मोडायला एक क्षण पुरतो. सोन्याच्या बांगडया करण्याची आपली किती तरी दिवसांची हौस होती. पण यांची अवस्था शंकराची ! सदा पीक, सदा भीक. एकच दिवस असा उगवला कीं एका रकमेनं तीनशें रुपयांच्या नोटा यांनीं खिशांतून

काढल्या. दोन गांवीं नाटकं शिकवल्याचा तो मुशाहिरा होता. दीड महिन्यानंतर हे भरल्या खिशानं घरीं आले होते. मी त्या दिवशीं मात्र हट्टाची शीग पोंचवली. म्हटलं, हीच संधि आहे; गेली कीं पुन्हा येणं दुर्घट. यांनीं पण ऐकलं. म्हणाले, 'राणीसरकारच्या मनासारखं होऊं दे.' त्याच दिवशीं त्यांनीं सोनाराला माझ्या हाताचा वेढ नेवून दिला. रोज मला सांगायचे, 'आज सोनाराकडे जाऊन आलों. परवां मिळतील. उद्यां मिळतील, आज संध्याकाळीं मिळतील. हे त्या घेऊन आले. त्यांची झळाळी पाहूनच माझे डोळे निवले. मधें एक कांचेची अन् खालींवर सोन्याच्या असे मी दोन्ही हात सजवले. देवाला नमस्कार केला. माझ्या 'सौभाग्या'ला उदंड आउक्ष चिंतिलं. त्या दिवशीं माझ्या दारीं सोनचांफा बहरला होता. हे म्हणाले, 'दोन दिवस घाल अन् मग काढून ठेव. असली वस्तु रोज घालून झिजवायची नव्हे.'

प्रभेचा बाप त्या दोन बांगड्या घेऊन सांखळीला निघून गेला, तरी प्रभा अजून त्या 'सोनियाच्या' भूतकाळांत रेंगाळत होती. स्मृतींच्या तीर्थांत न्हात होती. आपल्या गृहजीवनांतल्या एका सफळ, सुंदर दिवसाचा मुकुलित नयनांनीं जणूं वाढदिवस साजरा करीत होती. थोड्या वेळानें तिनं जवळ उरलेल्या त्या दोन बांगड्यांवर दृष्टि टाकली. त्या तिला केविलवाण्या 'वियोगिनी' वाटल्या. बापाच्या खिशांतून दोन वाटेस लागल्या होत्या त्यांचीहि तिला कींव आली आणि त्या अनुषंगानें स्वतःचीहि. विवेक करून तिनं मनाला शिकवलं, 'जिवापेक्षां कांहीं दागिना मोलाचा नव्हे. या ना त्या रूपानं सोन्याचा संग्रह करायचा तो अशा जिवावरच्या प्रसंगाला तें उपयोगी पडावं म्हणूनच नाहीं का?'

सकाळीं गेलेला बाप संध्याकाळीं परत आला. पण त्याच्या पिशवींत प्रभेला हवीं तीं औषधं नव्हतीं आणि इंजेक्शनंहि नव्हतीं. तो सागराचं गांभीर्य अन् जळत्या डोंगराचं दुःख घेऊन आला होता. पडवीवर येऊन

बसतांच प्रभेच्या आईनं गूळपाणी आणून पुढें ठेवलं; पण त्याची त्यानं दखल घेतली नाहीं. त्याची ती मुद्रा पहातांच प्रभेच्या आईचा जीव शंकाग्रस्त झाला. अधीर शब्दांत तिनं विचारलं.

" असे कां तुम्ही ? कांहीं हरवलं बिरवलं का ? "

" आधीं एकदां बुद्धि हरवली कीं मग सगळंच हरवत जातं. "

एवढ्यानं तिला बिचारीला काय उलगडणार ? गुळाचा तुकडा तोंडांत न टाकतां तो भांडंभर पाणी प्याला आणि प्रभेच्या अंथरुणाशीं आला. प्रभेच्या तोंडाकडे नुसता पहात बसला. तिलाहि वाटलं कीं दादा असं काय करताहेत हे ! तिनं आपला क्षीण, निस्सत्त्व हात त्याच्या मांडीवर टाकला.

" दादा, असं काय पहातां तुम्ही ? औषधं मिळालीं नाहींत का ? "

" नाहीं. " बापानं मान हलवली.

" कां ? नव्हतीं बाजारांत ? "

" होतीं, पण मीं विचार केला कीं त्यासाठीं तुझ्या बांगड्या मोडूं नयेत. उद्यां मी हिची गळसरी मोडीन आणि औषधं आणीन. "

" कां, असं कां आलं तुमच्या मनांत !...गप्प कां राहिलांत ? सांगा ना मला. अगदीं खरं खरं सांगा. काय वाटलं माझ्याविषयीं ? मी रागावेन असं वाटलं ? बोला ना दादा. "

त्यानं बोलायचं नाहीं असं ठरवलं होतं. पण मुलीच्या कळवळण्यानं त्याच्या हृदयाची पेटी उघडली. तो भावनेच्या लोंढयांत वाहवला अन् बोलून गेला—

" मुली, तुझ्या बांगड्या मोडल्या अन् तोडल्या तरी काय उपयोग त्याचा ? सोन्याचं गिलिट केलेला नग तुझ्यासारख्या भोळ्या मुलीकडे चालला म्हणून तो सोनाराकडे कसा चालेल ? प्रभा, तुझ्यासाठीं म्हणून तोंड आवरतों. त्या कसाबानं सोनं म्हणून सोनपितळ घातली तुझ्या हातांत—"

" दादा, काय बोलतां तुम्ही हें ! असं कसं..."

" बापाच्या शब्दावर नाहीं विश्वास बसत ? "

त्यानं खिशांतून त्या बांगड्या काढून अंथरुणावर आदळल्या. क्रोधावेशानं डोकं जणूं फुटून जाईल, म्हणून तें डाव्या हातानं गच्च दाबून धरलं. त्याचं बोलणं थांबलं होतं. फक्त निःश्वास तेवढे सुटत होते आणि तोंड बंद केल्या-मुळें आंतल्या आंत जळणाऱ्या शब्दांची झळ त्या निःश्वासांच्या वाटे बाहेर पडत होती.

प्रभा झटक्यासरशीं उठून बसली. जणूं तिला विंचूडंख झाला. तिच्या सर्वांगांतून कसल्या तरी लहरी उठून मस्तकांत घुसूं लागल्या. ती क्षणभर विलक्षण उत्तेजित झाली. पण हा आवेग आला तसा ओसरला! 'बापावर नाहीं विश्वास बसत?' या शब्दांनीं काळजांत घुमून तिच्या आवेशावर पाणी ओतलं. बापाशीं प्रतिवाद करण्यासाठीं बाहेर येऊं पहाणारे शब्द आंतल्या आंत निर्जीव झाले.

कसावर अंग घासून घेऊन आलेल्या त्या दोन बांगड्या तिच्यासमोर उताण्या पडल्या होत्या. तिनं त्या उजव्या हातानं वर उचलल्या. त्यांच्यावर कांहीं काळ डोळे जडवले. मग तीच दृष्टि वर उचलून बापाकडे लावली. पहातां पहातां तिच्यांत पाणी भरलं. आधींच फटफटीत झालेल्या मुखावर प्रेतकळा पसरली. जिभेला, टाळूलाच नव्हे, तर आंतून तिच्या काळजालाहि शोष पडला. बसल्या जागीं तिचीं सर्व गात्रं शहारूं लागलीं. बापाच्या शब्दा-वर तिचा पूर्ण विश्वास बसला होता. पण तरीहि तिनं एकदां विचार-ण्याचा प्रयत्न केला.

"दादा, खरंच का ही सोनपितळ? ... सोनं नव्हे? ... नव्हे?... ...दादाऽऽऽ—!"

आणि तिनं डोळे फिरवले. ती बसल्या बसल्याच मागें कोसळली अन् बाप तिला सावरायला पुढें होण्याच्या आंतच धाडकन् भिंतीवर आदळली. आईनें कांदा ठेंचून नाकाशीं धरला तरी बराच वेळ तिचे डोळे खालीं येईनात. जेव्हां तो कांद्याचा उग्र दर्प मेंदूंत पुरा भिनला तेव्हांच तिनं 'ऊऽऽ!' केलं. त्या अर्धवट शुद्धींतहि पुन्हा तेच शब्द अस्फुटपणें ऐकूं आले—

" सोनं नव्हे...सोनापितळ...! "

तिचं सोनं हरवलं नव्हतं. हरवली होती ती निष्ठा ! ती आजपर्यंत निष्ठेवरच जगली होती. निष्ठेचाच जीवनरस तिच्या प्राणांतून खेळत होता. सर्व आपदा-विपदा तिनं निष्ठेच्या बळावर तोलून नेल्या होत्या. ज्या क्षणीं तिची ती निष्ठा भंगली त्याच क्षणीं खरं म्हणजे ती संपली होती. नंतरचे चार दिवस उरली ती नुसती धुगधुगी. त्यानंतर तिच्या तोंडून शब्द निघाला नाहीं. तिची दृष्टि शून्यांतून खालीं आली नाहीं. जेवढे श्वासोच्छ्वास विधात्यानं तिच्या वांट्याला घातले होते तेवढे निश्चेष्टपणें पुरे करून ती एका संध्याकाळीं शांत झाली !

आपल्या पोटच्या गोळ्याच्या त्या कळाहीन मुखाकडे बाप निश्चल दृष्टीनें पहात राहिला. पहातां पहातां त्याचं काळीज गदगदून आलं. त्यानं थाड् थाड् कपाळावर हात मारून घेतले.

" पोरी...पोरी...तूं गेलीस याचं मला दुःख नाहीं. पण मरतांना तुझ्या निष्ठेला मीं नख लावलं त्याबद्दल माझं काळीज दुभंगलं आहे. निष्ठा हा तुझ्या जीवनांतला दैवी अंश होता. तें तुझं खरं सौभाग्य होतं. तें घेऊन तूं गेली असतीस तर तुझं सोनं झालं असतं. मला त्या वेळीं विवेक उरला नाहीं. मी खरं बोललों; पण तें नको असतांना बोललों. नवरा नव्हे, तर अंतकाळीं जन्मदाताच तुझा कसाब झाला ! काय केलं मीं हें......पोरी......माझ्या लाडक्या प्रभे ! क्षमा कर ! !..."

—

# मा नि नी

## ३

रात्रीचे दहा वाजून गेले होते. सह्याद्रीच्या घाटांतल्या काजळी अंधारांतून आगगाडी कॅसलरॉक स्टेशनकडे धांवत होती. डब्यांतले बहुतेक उतारू पेंगायला लागले होते. कोपऱ्यांत हातपाय आखडून बसलेल्या सखारामालाहि थोडीशी डुलकी मिळाली असती तर हवी होती. दिवसभराच्या रखडपट्टीनें तो थकला होता. दुपारीं भरल्यापोटीं आंबेज्याहून वाळपईपर्यंत चार मैल उन्हांतून त्याला चालावें लागलें होतें. त्यानंतर कुळें स्टेशनपर्यंतचा मोटार-प्रवासहि त्याला सुखकर झाला नव्हता. आणि आतां सकाळीं बेळगांव येईपर्यंत त्याला गाडींतून सुटका नव्हती. बरें, घरीं जाऊन तरी आरामशीर झोपायला मिळेल ही आशा ! छेः ! अकरा वाजतां कचेरींत हजर होणें भाग होतें. आणि म्हणूनच गाडीच्या खडखडाटांत, शिट्टयांच्या कर्कश आवाजांत अन् मध्येंच उठून भोकाड पसरणाऱ्या डब्यांतल्या पोरांच्या आक्रोशांत, खिडकीच्या फळीवर डोकें टेकून तो निद्रादेवीला प्रसाद–पाकळी लावीत होता.

पण चटकन् डोळा लागावा इतकें त्याचें मन आज स्वस्थ नव्हतें. एका अंगानें तें हृष्ट होतें अन् दुसऱ्या अंगानें तितकेंच खिन्न होतें. एक बाजू प्रकाशित आणि दुसरी अप्रकाश. एक बाजू त्याच्या अभिमानाची होती अन् दुसरी किंकर्तव्यविमूढ होती. यावेळीं त्याच्या डोळ्यांपुढें एक शांत, गंभीर, सत्त्वस्थ मूर्ति विराजत होती. तिचें ध्यान करतां करतां त्याच्या हृदयांत एकामागून एक विचारतरंग उठत होते. वर्तमानांतून तो भूतकाळांत चालला होता—

" आज मला ताईचं खरं दर्शन झालं. एखाद्या पुण्यक्षेत्रांत जाऊन कृष्णा–गोदेचं स्नान करून आल्यासारखं आज मला वाटत आहे. देवानं एखाद्याला बहीण द्यावी तर ती आमच्या ताईसारखी ! पण ती म्हणूं शकेल का असं कीं, ' देवानं भाऊ द्यावा तर असा ! ' उपेक्षेवांचून मी तिला दुसरं काय दिलं आहे ! आई पाहावी तर तिचीसुद्धां हीच तऱ्हा. तिला जेवतांना उचकी लागते ती आक्का अन् माई या दोघींची. त्या दोघी खात्यापित्या आहेत ना ! आक्का खानापूरच्या एका सावकारपुत्राची अर्धांगी अन् माई एका सायकलदुकानदाराची बायको. या दोघींच्या झगझगाटांत ताईचा स्निग्ध प्रकाश कोणाच्या डोळ्यांतच भरत नाहीं. ताईला सुद्धा चांगलं घरदार, ठिकाणभाट पाहूनच दिली होती. पण भाऊबंदांचा तंटा, सरकार दिवाण अन् त्यापायीं सावकाराचं कर्ज, या आपत्तिचक्रांत सांपडून तिचा नवरा बहुतेक सगळं गमावून बसला. हें तिचं दुर्दैव खरं; पण म्हणून काय आई–बापांनीं सुद्धां तिची माया पातळ करावी !

आता हीच गोष्ट पाहा. माझ्या लग्नाची फक्त कुंकुमपत्रिका अण्णांनीं तिला धाडली. केवळ कर्तव्य म्हणून ! अन् आक्का–माईंना तिच्यासोबत हीं लांबलचक अगत्याचीं पत्रं. मी मनांत म्हणत होतों, कीं तिच्या एकुलत्या धाकट्या भावाचं लग्न. ती आल्याशिवाय राहणार नाहीं. आदल्या दिवसापर्यंत मी वाट पाहत होतों. पण ती आली नाहीं. आलं तें तिचं पत्र अन् पांच रुपयांचा अहेर. माझ्याच नावें तिनं तें पत्र लिहिलं होतं.

" चि. सखाराम यास अनेक आशीर्वाद.

येत्या दशमीला तुझे दोहोंचे चार हात होणार. एक नवें गोड माणूस तुमच्या घरांत येणार. मी इथें असलें तरी माझे डोळे तुझ्याकडे आहेत मन तुला वेढून आहे. तुझ्या मस्तकावर मंगलाक्षता पडतील त्या वेळीं मी इथें देवापुढें उभी राहून त्याला तुझें सर्वभावें मंगल करण्याबद्दल आळवीन. माझी वहिनी रूपागुणाची असणारच. तिला तूं सुखी ठेव. आणि एक सांगतें तुला. रूपापेक्षा गुणांवरच प्रेम करावें माणसानें. तिनें सीता

व्हावें अशी अपेक्षा असली तर तूं सुद्धा राम होण्याचा प्रयत्न करायला हवा ........."

अकृत्रिम प्रेमरसानं लिहिलेलं तें पत्र होतं. त्यांतलं अक्षर न् अक्षर हृदयाच्या गाभ्यांत शिरत होतं. मला आलेल्या अनेक अभिनंदनपर पत्रांपैकीं एकालाहि त्याची सर नव्हती. मीं तें अनेकदा वाचलं अन् लग्न लागल्यावर हळूच सुनंदेच्या हातांत दिलं. तिनं तें वाचून परत दिलं, तेव्हां तिचे डोळे ओले झाले होते. तिनं मला विचारलं, 'या वन्सं लग्नाला कां आल्या नाहींत ?' काय सांगूं तिला मी त्याचं उत्तर !

माणूस शरिरावरचे घाव विसरेल; पण अंतःकरणावरचे त्याला कसे विसरतां येतील ! माईच्या लग्नांत ताईच्या वर्मावर झालेला प्रहार कोणालाहि यावज्जीव सलत राहील असाच होता. आक्काच नव्हे; तर आई–अण्णा सुद्धां त्या मर्मच्छेदांत सहभागी होते. आईला वाटलं असेल कीं, माली आपली गरीब; तेव्हां थोडाबहुत पक्षपात झाला तर तो तिनं आपली परिस्थिति स्मरून मनावर घेऊं नये. पण आक्काप्रमाणेंच आईचीहि कल्पना फसली.

माईच्या लग्नाचा तो दिवस. त्या दिवशीं आमच्या मांडवांत दक्षकन्या सती हिचं नवं आख्यान मांडलं. बापाच्या यज्ञमंडपांत सती एकटीच आली होती; पण आमच्या ताईचा नवरासुद्धां तिच्याबरोबर होता. ती आली ती कामाला जुंपली. यथाकाल आक्का अन् तिचा नवरा हीं दाखल झालीं. आईला आकाश ठेंगणं वाटलं. आक्का पैसेवाली; त्यामुळें नाजूक नार. आली ती सर्वांगीं देंवली. नवरा तिच्या कपाळावर हात ठेवून बसला. आईचे डोळे निवले. तिला वाटलं लेकीच्या नाजूकपणाचं कौतुक करूं का जावयाच्या पत्नीप्रेमाचं ! आईच्या मुखांत सारखं जांवईबुवांचं नामसंकीर्तन. ताईचा नवरा आपला होता दहा माणसांसारखा. असून अडगळ नव्हे, नसून खोळंबा नव्हे. त्याचं सर्वांच्या बरोबर चहापाणी. सर्वांच्या बरोबरच जेवणखाण. सगळं घर आपल्या भोवतीं फिरायला लावीत होता, तो आक्काचा नवरा. जरा कोणाचं पाऊल चुकार पडलं तर आक्का लगेच खुसमुसे.

त्यामुळें ताईचं घरांतलं काम वाढलं होतं. कामाधामाकडे दुर्लक्ष करून केवळ नवऱ्याभोंवती गोंडे घोळीत राहणं हें तिला मंजूर नव्हतं. आक्काकडून तो धडा अजून तिनं घेतला नव्हता. ती लक्षपूर्वक त्याला हवं नको पाही; पण कोणाच्या नजरेस विशेषसं येऊं न देतां. त्यामुळें आक्कासहित सगळ्यांना वाटलं की मालीचं नवऱ्यावर प्रेम म्हणतात तें बेतासबातच आहे. त्यामुळें नांव न घेतां त्याच्याविषयी उपहासाचे उद्‌गार काढायला आक्का–माईंना विशेषशी दिक्कत वाटली नाहीं.

आदल्या दिवशीं संध्याकाळीं माईच्या वराचं सीमांतपूजन होतं. सर्वांनीं तिकडच्या जानवश्यांत जायचं होतं. नात्यागोत्याच्या, ओळखीदेखीच्या बऱ्याच बायका त्यासाठीं आमच्या घरीं जमल्या होत्या. सर्वांचं लक्ष आपल्या-कडे वेधेल अशा रीतीनें आक्का आपलं प्रसाधन करीत होती. आपलं सगळं आटपून आरशांत रूपदर्शन घेतल्यावर तिनं ट्रंकेंतली एक लुगड्याची घडी बाहेर काढली अन् ताईला हाक मारली.

" माले ! "

" काय ग आक्का–" म्हणत ताई पुढें आली.

" झाली का तुझी तयारी ? "

" हो, ही पहा तयार आहें. "

" कसलं लुगडं नेसली आहेस हें ! हेंच नेसून का येणार आहेस आमच्या बरोबर ? चांगली शोभा करशील आमची. मला वाटलंच होतें तें. मी तशा तयारीनें आलें म्हणून बरं झालं. हें चंदेरी लुगडं नेस अन् हें पोलकं घाल. "

आक्कानं आपली उदार दृष्टि सगळ्या बायकांवर टाकली. पण अजून तिला आपल्या औदार्यावर कळस चढवायचा होता. दुसऱ्या एका डब्यांतून मोहनमाळ काढून ती ताईच्या पुढें करीत तिनं म्हटलं.

" ही घाल गळ्यांत. अगदींच लंकेची पार्वती नको. "

आमची ताई, अन् दुसऱ्याचं असलं कांहीं घेणार ! नांव कशाला ! आक्कानं जें दिलं तें सद्भावनेनं दिलं असतं, प्रदर्शन न करतां दिलं असतं, तिला त्या कामीं प्रेमाची गळ घातली असती, तर कदाचित् तिनं त्या वस्तूंचा स्वीकार केला असता. मोठ्या बहिणीचं मन मोडूं नये म्हणून तिनं आपल्या मनाची मिजास जरा बाजूला ठेवली असती. पण आक्काला द्यायचं होतं तें टोच मारून. स्वतःचा मोठेपणा अन् ताईचा हिणावा जगजाहीर करून. ताईचा स्वाभिमान एकदम गोळा होऊन आला अन् तिनं तुडस शब्दांत, पिळाच्या भाषेत, आक्काला सुनावलं.

" आक्का ! ठेवून दे तीं तुझीं लेणीं लुगडीं. माझ्या कामाचीं नाहींत तीं. तुला लाज वाटत असेल तर मी चार पावलं दूर राहीन तुझ्यापासून. राहतेंच आहें. कोणी बोट दाखवून विचारलंच तुला तर सांग लग्नघरची दासी बटकी आहे म्हणून. बरं—"

वीज लकलकावी अन् एकदम अदृश्य व्हावी तशी ताई तिथून चालती झाली. आक्काचा हा ' अव्यापारेषु व्यापार ' तिच्या चांगलाच अंगाशीं आला. दाखवायला गेली बडेजाव, पण बायकांना दिसलं तें तिचं काळं-ठिक्कर तोंड. त्या इकडेतिकडे कुजबुजूं लागल्या त्याचा सूरहि ' चांगलं नाक ठेचलं ' अशाच अर्थाचा होता. आई मायेचा पूर लोटीत तिच्या धांवण्या धावली नसती तर आक्काची गति कठीण होती. ' बहीण एवढं मायेनं करते तर तिच्यापुढें हा तोरा. अशानं कोणीसुद्धां विचारायचं नाहीं म्हणावं. ' हे उद्गार आई ताईच्या तोंडावर काढूं शकली असती कीं नाहीं कोण जाणे! पण ताईच्या परोक्ष तिनं ते काढले. ताईच्या कानावर ते गेले असतील कदाचित्. पण तिनें त्यावर कसलाच प्रतिवाद केला नाहीं. आपल्या माहेरीं मंगलकार्य आहे, तें निर्विघ्न पार पडलं पाहिजे, आपण त्यासाठीं झटलं पाहिजे अन् शक्य तर तोंडविख टाळलं पाहिजे, या जाणीवेनं ताई वागत होती.

पण ताईचं नष्टचर्य एवढ्यानंच संपलं नव्हतं. तिचे आणखी सोपस्कार व्हायचे होते. आम्ही सगळी मंडळी सीमांतपूजनासाठीं वराच्या जानवश्यांत निघालों होतों. आपल्या असल्या नसल्या सौंदर्याला पुनवेच्या कळा चढवण्यासाठीं सगळ्या पुरंध्रींनी ‘ आगंतुक गुणांची सोय ’ धरली होती. त्या सगळ्या मेळाव्यांत साधीसुधी होती ती आमची ताई. साधंच पण झुळझुळीत लुगडं, हातभर बांगड्या, कपाळीं कुंकवाची ‘ सुरेख ’ चिरी, मधोमध भांग पाडून केसांचा सावळ्या मानेवर रुळवलेला अंबाडा अन् मुखावर कोणत्याहि राहूला ग्रासतां न येण्याजोगं स्वाभिमानाचं तेज...पण स्वाभाविकतेची बूज न करणारं भोंवतींचं जग मात्र तिला दुर्लक्षूनच वागत होतं.

गाद्या–लोडांच्या बैठकीवर अजून नवरदेव येऊन बसला नव्हता. त्यामुळें उभयपक्षांच्या बायका उभ्याच होत्या. उपाध्ये वरपूजेची मांडावळ करीत होते. एवढ्यांत आक्काचा नवरा तिला बाजूला घेऊन तिच्या कानांत कांहीं तरी पुटपुटला. आक्का आईच्या कानाशीं लागली. आईनं आण्णांजवळ तीच कानगोष्ट करून म्हटलं.

“ त्यांना नाहीं आवडत तर आपण तरी कशाला आग्रह धरावा ! मालीच्या नवऱ्याला काय द्यायचं तें आपण घरीं देऊं.”

मी या प्रकरणांत जरा अधिक खोल शिरलों तेव्हां मला कळलं कीं, आक्काच्या नवऱ्यानं अण्णांना खलिता धाडला आहे. ‘ ज्येष्ठमानाच्या वेळीं माझ्या शेजारीं ताईच्या नवऱ्याला बसवाल तर मी तो'मान न समजतां अपमान समजेन ! ’ आईला आपल्या मोठ्या जांवयाचं म्हणणं रास्त वाटलं होतं. एका परीटघडीच्या पुरुषाशेजारीं त्याच अधिकाराचा म्हणून एक कोंकणी बावळा आणून बसवणं हा केवढा सामाजिक अन्याय होता ! आईचं मत अण्णांनीं मानलं हें सांगायला नकोच !

आणि त्यानंतर योग्य वेळीं आक्का आणि तिचा नवरा या दोघांचीच पूजा होऊन त्यांना ज्येष्ठमान दिला गेला. उपाध्यायांनीं ताईच्या नवऱ्याची आठवण दिली; पण आईनं त्यांच्यावर गप्प बसण्यासाठीं डोळे वटारले. मी ताईच्या मुद्रेकडे पाहिलं. ती एखाद्या निळ्या डोहासारखी गंभीर होती. तिच्या डोळ्यांत तपस्विनीचा संयम दिसत होता. तिनें आपली अस्वस्थता कोणाला कळूं दिली नाहीं. आक्का मात्र खूष झाली असावी कीं, मघांच्या अपमानाचं सायसंगीत उट्टं निघालं.

रात्रीं जेवणाच्या पंक्तींत ताई दिसली नाहीं. तिच्या नवऱ्यालाहि भूक नव्हती म्हणे ! ताईला तो अपमान जिव्हारीं झोंबला होता हें निःसंशय. आधींचा अपमान तिच्या बहिणीनें केला होता. नंतरच्या प्रकारांत खुद्द तिचे आईबाप सामील होते. ज्यांनीं तिला कार्यासाठीं मुलगी म्हणून बोलावलं ते. मी जेवून वर जातों तों तीं दोघं कांहीं तरीं बोलत होतीं. बहुधा याच प्रकाराविषयीं असावं. नवऱ्याला ती जें सांगत होती तें अस्पष्टसं माझ्या कानात शिरलं होतं आणि तें भविष्यार्थाचं सूचक होतं. पण मला तरी थोडीच ताईच्या रागालोभाची कदर !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां लग्न लागलं. ‘ वाजवा रे वाजवा ’ झालं. वधूवरांच्या मस्तकावर मंगलाक्षता पडल्या. आणि थोड्याच वेळांत ताईनं आपली ट्रंक बाहेर काढली. तिचा नवराहि डोक्याला रुमाल बांधून प्रस्थानाला सिद्ध झाला. रस्त्यावर उभें राहून त्यानं एक टांगा थांबवला. देवाच्या पाया पडून ताई जेव्हां आई–अण्णांच्या पुढें नमस्काराला वांकली, तेव्हां आईनं आश्चर्यात बुडून विचारलं,

“ माले ! हें काय ? तूं निघालीस कुठें ! ”

“ माझ्या सत्तेच्या घरीं. जिथं माझा कोणी अपमान करणार नाहीं अशा माझ्या घरीं. ”

“ अग, म्हणजे काय ? ”

" आई, तूं हें मला विचारूं नयेस अन् मी सांगूं नये. सगळ्या गोष्टी मनोमन सगळ्यांना ठाऊक आहेत. "

" इतकं काय मनाला लावून घेतेस, माले! "

" विश्वासाच्या ठिकाणीं डाग बसला कीं तो सोसणं कठीण होतं. आई, मी गरीब आहें हें सगळ्या जगाला ठाऊक आहे. पण मी लाचार नाहीं हें निदान तुला तरी ठाऊक असायला हवं होतं. "

यावर कोण काय पुढें बोलणार! बोलायला तोंड होतं कोणाला! प्रत्येकाला ज्याचं त्याचं मन खात होतं. मग आईनं डोळ्यांत पाणी आणलं. आक्कानंहि तिच्या जोडीला चार थेंब टाकले. दोघींनीं मिळून तिला गळ घातली. आपली चूक कबूल केली. पण ताईचा निर्धार भंगला नाहीं.

मुलींना देण्यासाठीं म्हणून आईनं लुगडीं घेऊन ठेवलीं होतीं. आक्कानें केलेल्या अहेराला साजेसं म्हणून तिला जरीचं लुगडं घेणंच भाग होतं. ताईच्या देणगीसारखं तिला साधं चालण्याजोगं होतं. सगळीकडे पक्षपात होता तसा तो लुगड्यांच्याहि बाबतींत होताच. पण या वेळीं आईला काय वाटलं कोण जाणे! तिनं घाईघाईनं जरीचं लुगडं तिला देण्यासाठीं बाहेर काढलं. आई लावायला आलेल्या कुंकवासाठीं तिनं कपाळ पुढं केलं खरं; पण लुगड्याच्या घडीसाठीं मात्र हात मागें घेतला.

" अं, हं! मला निराळं लुगडं नको. मी नेसलें आहे तें तुझ्याच कृपेचं अन् तुझंच असं समज–"

आईचा लुगड्याची घडी धरलेला हात थरथर कांपत होता. मला तें पाहवलं नाहीं. मी तुसडेपणें बोलून गेलों.

" नको असलं तर गेली उडत! असला फार्स करायचा होता तर आली कशाला––"

मी दिलेली ही शेवटची मात्रा होती. इजा, बिजा अन् तिजा! सगळी पूजा झाल्यावर आपल्या धाकट्या भावाचं हें मंत्रपुष्पहि तिनं शिरीं झेललं.

भरल्या मांडवांत, माणसांच्या घोळक्यांत, व्याहीमंडळींच्या डोळ्यांदेखत, नवा जांवई आश्चर्यस्तब्ध होऊन पाहत असतांना एवढी कठोर शिक्षा आई-अण्णांना देऊन ताई निघून गेली ! त्या मंगलसमारंभांतलं चैतन्य तिनं आकर्षून नेलं. मांडल्या उत्साहावर पाणी ओतलं. तिनं ओतलं असं म्हणण्या-पेक्षां तिची अवगणना करणाऱ्या आमच्या माणसांनीं स्वतःच्या हातांनीं तें ओतून घेतलं असं मी आज मानतों. रस्त्यावरच्या पायरीवर उभा राहून मी तिच्या जात्या टांग्याकडे पाहत होतों. टांगा वळण घेतांना मी पाहिलं कीं ताई डोळ्यांना पदर लावीत आहे. सगळ्यांचा त्याग करून जात होती ती मानिनी. रडत होती ती तिच्यांतली माहेरवाशीण !

मला वाटलं, ताईचा अनेकदां अपमान झाला हें मान्य; पण तिनं असं तोंडांत पाणीसुद्धां न घालतां निघून जायला नको होतं. तिच्या या कृतीनं कार्याचा तर बेरंग झालाच; शिवाय गांवांत आमची अब्रू वाजतगाजत गेली हें निराळं. पण तिनं तरी काय करावं ! राहायचं म्हणजे तिला अंतर्यामीं चटके सोशीतच राहायला हवं होतं. माणूस एकदां सोसतो असं कळलं कीं—

माझी स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. मन एकदा ताईकडे तर एकदां आईकडे असं हेलकावे घेत होतं. ताईचं वागणं बुद्धीला पटलं; पण आपमतलबी भावनेला पटेना. तिची बाजू न्यायाची असूनहि मी तिच्यावर नाराज झालों. आई-आक्का त्यानंतर खूप बोलल्या. चार दिवस पुढें तीच चर्चा चालली होती. आपली चूक झाली हें जें त्यांना वाटलं होतं, तें क्षणिक ठरलं होतं. त्या आतां मूळ स्वभावावर आल्या होत्या.

त्यानंतर गेलीं पांच वर्षे ताई माहेराला मोहरली नाहीं. तिचं एक बोटभर पत्रहि आलं नाहीं. सगळे मायापाश तिनं जणूं तोडून टाकले. आपलं माहेर भूतकाळांत जमा झालं असंच जणूं ती समजली. मीही घाट उतरून तिच्या घरीं कधीं गेलों नाहीं. तिच्याकडे जाणं मला कसंसच वाटत होतं. जो तो आपल्या जागीं बरा असं झालं होतं. आमच्याकडून तिला पत्र धाडण्याचा

प्रसंग आला होता तो माझ्या लग्नाच्या निमित्तानं. ती येणार नाहीं हें ठरलेलं होतं अन् आई-अण्णांना तेंच इष्ट होतं.

पण काय असेल तें असो ! तिचं जें आशीर्वादाचं पत्र आलं त्यानं मला ताईची ओढ लावली. आई–अण्णांविषयीं तिच्या भावना काय होत्या तें देवाला माहीत ! पण माझ्याविषयीं तिच्या मनांत अपार माया आहे हें त्या पत्रांतलं प्रत्येक अक्षर बोलत होतं. आक्का अन् माई यांच्या बंधुप्रेमापेक्षां ही जात कांहीं निराळी आहे हें मला आंतून जाणवूं लागलं. त्या दोघी बाहेरी माझं खूप कौतुक करीत होत्या. पण त्यांत निरपेक्षपणा आहे हें मी खात्रीनं सांगूं शकलों नसतों. त्यांत देवाण–घेवाणाचा भाग बराच असावा, तुम्ही बरे तरच आम्ही बऱ्या, अशी वृत्ति असावी हें सहज दिसून येण्याजोगं होतं.

आतां त्या दोघींच्या तुलनेनं ताई मला निराळीच दिसूं लागली. माझ्या लग्नाच्या त्या चार दिवसांत ताईचा उल्लेख अनेकदां झाला. पण सगळ्यांचा सूर एकच वहात होता. ‘ माली मिजासखोर आहे. दैवानं उणी आहे तर इतकं, मग चालता काळ असता तर हिची मान कांठ्यावर सांवरलीच नसती. ’ मला हें ऐकून दुःख होई. सर्वांनीं दाखवलेल्या या तुच्छतेमुळेंच ताई माझ्या मनावर अधिक ठसली अन् मी ठरवलं कीं, लग्नसमारंभ आटोपल्यावर आंग्रेड्याला जाऊन तिला भेटून यायचं. रिकाम्या हातानं नव्हे; तर एक सुंदर जरीचं लुगडं घेऊन. आईची नाखुषी पत्करूनच मी निघालों अन् काल दुपारीं अकल्पितपणें ताईच्या आंगणांत उभा राहिलों. संशयी मन आंतून मला डिवचीत होतं. ‘ तूं आला आहेस खरा; पण ताई तुझं जीव ओंवाळून स्वागत करील याबद्दल तुला भरंवसा आहे ? तुमच्या घरीं ताईची अवहेलना झाली त्यांत तूंहि सोवळा राहिला नाहीं आहेस. आठव तुझे त्या वेळचे शब्द ! ‘ नको असलं तर गेली उडत ! असला फार्स करायचा होता तर आली कशाला– ’

पण माझी झुळूक दिसतांच केवढ्या हर्षानं ताई बाहेर आली! भर दुपारीं त्या पडवींत पौर्णिमा उल्हासली. प्रथम तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. वळचणीचं पाणी आढ्याला कसं चढलं असाच कांहीं तरी विस्मयभाव तिच्या डोळ्यांत पुंजाळला अन् मग ती म्हणाली.

"ये सखा! बैस. सकाळींच दारांतल्या फणसावर कावळा ओरडत होता. मी म्हटलं, कोणी पाहुणा येणार असेल तर उडून जा. पण तुझी मात्र कल्पनाच नव्हती."

एवढ्यांत भावजीहि मागील दारीं होता तो पडवींत आला. मी त्या दोघांनाहि नमस्कार केला. 'आउक्षवंत हो' हे ताईचे आशीर्वादाचे शब्द. अमृताचे कल्लोळ वाटावे इतके ते गोड होते. 'किती मोठा झालास रे!' या शब्दांनीं माझं कौतुक करून ती घरांत गेली. मग तिचं सारखं आंतबाहेर सुरू झालं. तिचीं मुलं कधीं माझ्याभोंवतीं तर कधीं तिच्यामागें घोटाळूं लागलीं. आपलीं तोंडं गोड करणारा मामाहि त्यांना गोड वाटला होता. ताईनं दुसऱ्या भाताची तपेली चुलीवर चढवली. भावजीनं न्हाणींत विस्तव घातला.

'ताई गरीब, ताई गरीब' हें मनाशीं जपीत मी तिथें गेलों होतों. पण गरिबीचं चिन्ह मला तिथें कांहीं आढळेना. तिचं घर केंबळी होतं एवढंच काय तें. पण आसमंत श्रीमंत होता, शोभिवंत होता. आंगण स्वच्छ होतं. मेरेच्या कडेनं तुळशीचीं, पाचेचीं रोपं डोलत होतीं. कुंपणाच्या पांगाऱ्यावर मोगरीचे वेल चढले होते. घराच्या मागें पुढें फणस लागले होते. पाटाकडच्या मान्कुराद कलमावर आंब्यांचे घड लोंबत होते. न्हाणीच्या खोपींतलं पाणी ज्या खोलगट भागांत जिरत होतं तिथें रसबाळ्या केळी पोसल्या होत्या. ताईच्या गोठ्यांत वासरूं होतं तें 'चैतन्याचा गाभा' होतं. पडवीच्या पायरीवर मांजर बसलं होतं तें बाळं बाळं गुबगुबीत होतं अन् आपली शेपटी सुखासीनपणे पुढच्या पायांवरून डावीकडे वेटाळून, आपण भाग्यवंताच्या घरचे आहों असं सुचवीत होतं. कजा-दाव्यांत जें गेलं तें

ब्रह्मार्पण झालं होतं; पण जें उरलं तें ताईनें सुरेख सजवलं होतं. थोड्या जमिनींतून आधिकांत आधिक मिळवण्याची त्या दोघांनीं महत्त्वाकांक्षा धरली होती. जीवनाला आवश्यक तें तिच्यापाशीं होतं. नव्हता तो छन्‌छन् आवाज. नव्हते ते राजाच्या मुखवस्थ्याचे कागद. आम्हांला त्यांची कितीहि किंमत असली तरी तिला नव्हती.

आमचं जेवण झाल्यावर स्वतःचं पान वाढून घेण्यापूर्वी ताईनें एका केळीच्या फाळक्यावर आंब्याएवढा भात, वर थोडं सांबारं अन् शेजारीं थोडीशी भाजी, असं घालून तें पान बाजूला काढून ठेवलं.

" हा गोग्रास वाटतं ? " मी म्हटलं.

" गोग्रास नाहीं रे. पलीकडच्या खोपटांत एक म्हातारी कुळवाडीण आहे. कोणी आधार नाहीं तिला. पूर्वी ती आमच्याच घरीं काम करून खाई. पण आतां हातपाय अडले आहेत, तेव्हा थोडंसं ठेवतें तिच्यासाठीं. "

मी मनांत म्हटलं, जें श्रीमंतांच्या घरांतहि होत नाहीं तें आमची ताई करते. मग ही गरीब कशी ? आमच्या घरीं सगळीं हिला गरीब म्हणतात तें कां ? गरीब माणसं देऊं शकतात ? हिला हा दयाधर्म कोणी शिकवला ? वाईट परिस्थिति पुष्कळशा चांगल्या गोष्टी शिकवते म्हणतात त्यांतूनच ताईला ही शिकवण मिळाली असेल का ?

उष्टं खरकटं आटपल्यावर ताईनं आपला कारखाना सुरू केला. ताई फावल्या वेळांत केळीचे द्रोण लावून विकीत होती. शंभर शंभर द्रोणांचे शुभ्र गाभ्यांत बांधलेले ' कट ' पडवींतल्या दांडीवर सांगडी करून लोंबत होते. भिंतीच्या मुळांत शेनवतांचे संचे डाळून ठेवलेले होते. दुसऱ्या बाजूला वाळल्या पानांचे पेळे एकावर एक बांधून पडले होते. मला कळलं की ताई भल्या पहाटे उठून गांवांतलीं सगळीं कुळागरं हिंडते आणि मोडून वाळलेलीं शेनवतं दंवानें ओलसर आहेत तोंच फराफर ओढून गोळा करून आणते. मला असंहि दिसून आलं कीं आपली ताई

उद्योगमूर्ति आहे. दारिद्र्य तिचं घरदार ग्रासायला आलं होतं; पण उद्योगाचं कुंपण उभारून तिनं त्याचा प्रवेश नाकारला आहे. ती खांबलीला टेकून बसली. लांब केलेले पाय तिनं एकावर एक ठेवले. ती तिची उद्योगांतली विश्रांति होती. तिला बसलेली पाहतांच भावजी वामकुक्षी सोडून उठला. त्यानं तिला संचे योग्य आकारांत विळीनें सरसर कापून दिले. एकेक जोड पान घेऊन ती द्रोणाच्या आकारांत दुमडूं लागली. कुच् कुच् चोया टोचल्या जाऊं लागल्या. एकेका द्रोणानं पुढचा ढीग वाढूं लागला.

मी तिच्याशीं बोलत बसलों. तिच्या उद्योगांत वेडावांकडा सहभागीहि झालों. बोलतां बोलतां अनेक गोष्टी निघाल्या. ती रंगली अन् मीहि रंगलों. मला वाटलं, आपण जें कांहीं तिच्यासाठीं आणलं आहे तें देण्याची हीच वेळ आहे. मी उठलों. बॅग उघडून ती लुगड्याची घडी बाहेर काढली आणि खण नि कुंकवाची पुडी यांच्यासह ती तिच्यापुढें ठेवली.

" ताई, हें माझ्या लग्नाचं तुला लुगडं आणलं आहे. "

ताईनें त्या मऊ, आकर्षक घडीकडे जरा वेळ स्थिर दृष्टीनं पाहिलं. पाहतां पाहतां ती गंभीर झाली. तिचं बोलणं थांबलं. पटापट द्रोण लावणारे हात स्तब्ध झाले. काळ्याभोर डोळ्यांत पाणी उभं राहिलं. मला मोठं अवघडल्यासारखं झालं. मी माझा भाव तिला विशद करूं लागलों.

" ताई, हें लुगडं पाहतांच कोणत्या स्मृती तुझ्या अंतरांत उचंबळून आल्या असतील त्याची मला कल्पना आहे. पण हें दुसऱ्या कोणी नव्हे; तर मी तुला दिलेलं आहे. माझ्या पैशाचं आणि तुझ्या भावजयीच्या पसंतीचं. सगळ्यांना अहेरओट्या झाल्या; पण तूं चुकलीस हें मला बरं वाटलं नाहीं, म्हणून मी हें घेऊन आलों. ताई, तुझा आमच्यावरचा राग अजून गेला नाही का ? निदान माझ्यावरचा तरी—"

" छेः छेः ! असं म्हणूं नकोस सखा. मी कोणावरच रागावलें नाहीं. तुझ्यावर तर मुळींच नाहीं. माझं हृदय सुखानं तुडुंब भरलं आहे.

पावसाळ्यांतल्या नदीच्या लोंढ्यासारखा तूं मला भेटायला धांवून आलास. आम्हा तीन बहिणींत सर्वांना हवा हवा म्हणून झालेला तूं एकटा एक अपूर्वाईचा भाऊ. तूं भेटावास म्हणून मी किती तळमळत होतें तें माझं मलाच ठाऊक. अनेक भाऊबिजा आल्या अन् गेल्या. पण एकहि आनंदानं उजळली नाहीं. एखाद्या वर्षीसुद्धां तुला यावंसं वाटलं नाहीं. मी गरीब; तेव्हां अधिक कांहीं मागेन, म्हणून का माझा भाऊ येत नाहीं, असं मला सारखं वाटायचं. मी मनांतल्या मनांत म्हणायची.

**“ नको धन नको मुद्रा । नको मोतियांचे हार**
**देई प्रेमाश्रूंची धार । भाईराया ”**

मला तूं स्वप्नांत दिसायचास. मुंजींतलं मंडावळ्या बांधलेलं तुझं रूपडं डोळ्यांपुढें उभं राहायचं. तुझ्या लग्नाचं पत्र आलं तेव्हां तूं एवढा मोठा झाला असशील हें क्षणभर खरंसुद्धां वाटेना. ”

“ इतकी माझी आठवण येत होती म्हणूनच वाटतं लग्नाला आली नाहींस ? ” मी जरा उसन्या रागानं तिला म्हणालों.

“ मला हल्लीं कुठं जावंसंच वाटत नाहीं. आपली मठी बरी कीं, आपण बरं. गरिबी आणि स्वाभिमान या दोन गोष्टींचं कधीं सूत जमत नाहीं. तें आपल्यालाहि तापदायक होतं अन् दुसऱ्यालाहि. आमच्यासारखं माणूस कुठें गेलं कीं लोकांना वाटतं, हात पसरायला, तोंड वेंगाडायलाच आलं आहे. मी अनुभव घेऊन चुकलें आहे या गोष्टीचा. आपल्यालाहि मग वाटतं, हीं माणसं आपल्याशीं बोलतात त्यांत उपहास तर नाहीं ना ? कांहीं खोंच तर नाहीं ना ? या संशयानंच मी आधीं अर्धीमेली होतें. सीता–द्रौपदी आपल्या नवऱ्याबरोबर सगळं टाकून वनांत कां निघून गेल्या त्याची मला आजच्या स्थितींत चांगली कल्पना येते. आप्तस्वजनांत राहणं नको, त्यांचीं उणींदुणीं सोसणं नको. कुठं जायचं तें कशाला ? सुख अन् आनंद मिळविण्यासाठींच ना ? माझ्या सुखाला इथें वाण नाहीं. हातपाय राबताहेत तोंवर दोनवेळच्या पेजेला मरण नाहीं...”

एवढ्यांत भावजी पाटाखालच्या माडाचे नारळ काढून घेऊन आला अन् आमचं बोलणं थांबलं. चार नारळांची ती गांथण ताईच्या पुढें ठेवून तो जेव्हां म्हणाला कीं, 'घाला बाईसाहेब आतां बंधुराजांना मोदक करून' तेव्हां मनावर आलेलं गांभीर्याचं दडपण एकदम दूर झालं. रात्रीं खरो-खरच ताईनं माझ्यासाठीं उकडीचे मोदक केले अन् बरोबर गाडग्याचा दादरा सोडून गायीचं पिवळं धमक, रवाळ तूप डाव भरून वाढलं. ताईचीं मुलं, भावजी अन् मी—किती प्रसन्न वातावरणांत ती पंगत चालली होती ! माझ्या जिभेची धणी पुरली तशी आत्म्याचीहि. मला वाटलं, मीच कशाला; ब्रह्मा—विष्णु—महेश ताईच्या दारीं आले तर तेहि हिच्या आति-थ्यांतला जिव्हाळा पाहून प्रसन्न होतील.

ताई रहा म्हणून आग्रह करीत होती. मलाहि राहावंसं वाटत होतं. तरी मी आज दुपारीं तिथून निघालों. नोकरीचा पाश आहे ना मागें ! यायच्या वेळीं मीं दिलेलं तें लुगडं ताईनं परत माझ्या हातांत ठेवलं. फक्त वरचा खण तेवढा बदलला होता. मी दिलेला ठेवून घेऊन तिनं त्या जागीं आपल्या घरांतला दुसरा त्या घडीवर ठेवला होता. ती म्हणाली.

" हें माझ्या वहिनीला दे. माझं म्हणून ! "

तेव्हां मात्र मी चकित झालों. मनांतून रागवलोंसुद्धां.

" भावाच्या प्रेमाची हीच किंमत केलीस ना तूं ! त्या वेळीं तुझा अप-मान झाला त्याचं उट्टं तूं आज काढलंस, असंच समजूं ना मी ? "

" असं नको समजूं सखा ! हें लुगडं किती भारी किंमतीचं आहे हें पाहिलंस ? एखाद्याला देतांनासुद्धा कोणाला काय झेपेल, कोणाला काय साजेल याचा विचार करायला नको का ? मुलींनीं जाड्या भरड्या चिटाचे परकर वापरायचे, यांनीं चवाळी पंचा नेसायचा अन् माझ्या अंगावर मात्र जरीचं लुगडं ! बरं दिसेल का हें ? जनाला सोडच; पण मनालासुद्धा तें प्रशस्त वाटायचं नाहीं. घरांत तसंच ठेवून तें कसरीच्या भक्ष्यस्थानीं

घालायचं त्यापेक्षां वहिनीला हें नेसूं दे. त्याचा उपयोग होऊं दे. मी तुझा अपमान नाहीं करीत. तूं मला कोणा येत्या-जात्याबरोबर दुसरं एखादं साधं लुगडं धाडून दे. दणकट अन् वर्षभर पुरेल असं. मी तें आनंदानं नेशीन. अन् प्रत्येक वेळीं तुझी आठवण काढीन. माहेरची तिळाएवढी वस्तुसुद्धा आम्हां बायकांना किती अमोल वाटते, त्याची तुला कल्पना नाहीं होणार. आतां तरी पटलं का ? ''

ताईचं बोलणं खरं होतं. युक्तिसिद्ध होतं. मला तें खोडून काढतां येईना. मी तिच्या मुद्रेकडे पाहिलं. डोळ्यांवाटे आंत शिरून तिच्या हृद-याचा ठाव घेण्याचा प्रयत्न केला. पण तिथं अहंकाराचा वारासुद्धा नव्हता. कसलीहि कटु भावना नव्हती. तिनें फक्त सोय पाहिली होती. कोणतीहि वस्तु कारणीं लागावी, तिचा दुरुपयोग होऊं नये, अशी जी गरिबींत मनाला एक संवय लागते तिचाच तो एक भाग होता. ज्या प्रकारची वस्तु घरांत सर्वांना वापरतां येत नाहीं ती आपण एकट्यानं वापरणं योग्य नव्हे, ही तिची भावना गृहिणीधर्माला भूषणास्पदच होती. सगळ्यांना वगळून तिलाच एकटीला जरीचं लुगडं देणारा मी तरी कितीसा शहाणा होतों ! पण मला एवढा पोच कुठला ? खरं म्हणजे आईनंच या गोष्टीची दखल घ्यायची आणि सर्वांची संभावना होईल अशी तजवीज करून मला पाठवायचं. पण तिला मी ताईकडे जातों हेंच जिथे मान्य नव्हतं तिथे ती कशाला अधिक पंचाइत करील !

नाइलाजानं मी तें लुगडं ट्रंकेंत कोंबलं आणि रस्ता सुधारला. मागें वळून ताईचे पाझरते डोळे पाहण्याचा मला धीर झाला नाहीं.

---

# आज मी असंच बोलणार ४

“ आज तुम्हाला झोप कशी येत नाहीं ! काय होतंय् ! ” तिनें मला कणव्रेच्या स्वरांत विचारलं.

“ मला झोप नाहीं हें तुला कसं कळलं ! झोपेंत का जागेपणीं ? ” मीं तिला प्रतिप्रश्न केला.

“ झोपेंत कसं कळेल माणसाला ? ”

“ मग आम्हां दोघांनाहि झोप कां येत नाहीं, असं विचार कीं. ”

“ बरं बाई, तसं विचारतें. ”

“ तर मग जरा ऊठ अन् दिवा लाव. आज मला तुझ्याशीं खूप बोलायचं आहे. सगळ्या पूर्वस्मृती उजळून घ्यायच्या आहेत. मन कसं उचंबळून आलं आहे. शब्द अनावर झाले आहेत. मला वाटलं तुला झोप लागली, म्हणून. ”

तिनं उठून दिवा लावला अन् आधीं माझ्या कपाळावर हात ठेवला. ताप–बीप आला कीं आमची स्वारी तत्त्वज्ञान बोलूं लागते हें तिच्या अनुभवांतलं. पण माझं डोकं थंड होतं. ‘ अग, मला कांहीं झालं नाहीं. तूं निश्चिंतपणें बस अशी इथें. ’ मीं म्हटलं. आम्ही दोघं समोरासमोर बसलों. मी चार दोन क्षण तिच्या नजरेंत नजर मिसळली. कांहींहि न बोलतां नुसता बघतच राहिलों. तिला त्यामुळें अवघडल्यासारखं वाटलं नि तिनें विचारलं,

“ काय सांगायचं आहे ! ”

“ चार दिवसांपूर्वी आपल्या चंदूचं लग्न झालं. खरं ना ! ”

" तें आतां जगजाहीर आहे. "

" या लग्नाची एकंदर घटना तूं लक्षांत आण. एका पंधरवड्यापूर्वी चंदूनं चार पांच मुली पाहिल्या. त्यांतली एक त्याला पसंत पडली. आम्ही म्हटलं, ' तुला पसंत, ती आम्हांला पसंत. ' देणं घेणं ठरलं. मुहूर्त निश्चित झाला. सकाळीं लग्न लागलं. संध्याकाळीं वरात आली. अन् त्याच रात्रीं नवऱ्याला बायको लाभली. सगळं कसं झट्पट् ! उत्कंठा नाहीं, हुरहुर नाहीं, लपंडाव नाहीं, उत्तेजन नाहीं, दुसऱ्याच्या अंतराचा ठाव घेणं नाहीं, कांऽऽहीं नाहीं. आज दे, उद्यां वाढवून घे, ही उधारीची बातच वर्ज्य. सगळा रोखठोक व्यवहार. एकदम मुद्द्याशीं गांठ. आदल्या रात्रीं ती त्याची कोणी नव्हती. अन् दुसऱ्या रात्रीं एकदम सर्वभावें त्याचीच. मला वाईट नाहीं वाटत हो ! खुशाल तीं एकमेकांचीं होऊं देत. माझा त्यांना काळ-जाच्या गाभ्यांतून आशीर्वाद आहे. पण मला एक सांग, यांचं हें प्रेम असंच टिकेल ना ? "

" इश्शं ! न टिकायला काय झालं ? अशा भलत्या कुशंका काय काढायच्या ? "

" मायेच्या पोटीं असल्या शंका उद्भवतात. जीवनांतली फार मोलाची वस्तु अशी अभोगत, एकदम मिठी घालायला आली, कीं माझं तरी मन भांबावतं, पलट खातं. वाटतं कीं—"

" इडा पिडा टळो– " तिनं माझ्या तोंडावर हात ठेवला.

" छे बुवा ! भलतीच भावनाप्रधान आहेस तूं. अग, आपण एका उच्च बौद्धिक पातळीवरून संभाषण करतों हें. चंदू हा केवळ निमित्तमात्र. आजच्या सगळ्या तरुण पिढीविषयींच हे विचार माझ्या मनांत येतात. आमच्या वेळची परिस्थिति याहून किती तरी भिन्न होती. चार दिवसांपूर्वी पुण्यांत झालेलं चंदूचं अन् सूनबाईचं लग्न अन् तीस वर्षांपूर्वी गोव्यांत झालेलं तुझं माझं लग्न ! जरा तुलना कर या दोन लग्नांची. तुझी तुलाच गंमत वाटेल. आठवतं कां कांहीं ? "

" न आठवायला काय झालं ? सारं कांहीं आठवतं."

" अग, चंदूला जें चार प्रहरांत लाभलं, तें मला लाभायला तब्बल सहा वर्षे तपश्चर्या करावी लागली."

" पुरें झालं तुमचं. आज काय चळ भरला आहे कीं काय ?"

" तूं काय वाटेल तें म्हण. पण आज मी असंच बोलणार. सगळं आठवून आठवून सशब्द करणार. चारचौघांत तर बोलत नाहीं ना ? एकांतांतच बोलतों आहें—"

" मग बोला हवं तें. मारणाराचा हात धरवेल; पण बोलणाराचं तोंड कोणी धरील !"

" ऐक तर मग ! ज्या दिवशीं तुझ्या—माझ्यांतलं द्वैत मोडलं त्या दिवशीं, किंवा रात्रीं म्हण हवं तर; आपण एकमेकांना संपूर्ण परिचित होतों. एकमेकांच्या आवडी नावडी, गुण अवगुण, स्वभावाचे विशिष्ट कंगोरे हे आपण आधींच जाणून घेतले होते. कशाला प्रोत्साहन द्यायचं, कशाकडे दुर्लक्ष करायचं अन् आपली संसारनौका भोवरे वळसे चुकवीत कशी हाकायची हेंसुद्धा, तहाचे मसुदे न करतां आपलं मनोमन निश्चित झालं होतं. तो संबंध केवळ शारीरिक नसून, शारीरिक आधिक आत्मिक होता.

ते दिवस आठवले कीं, मी कवि होतों. तुझ्या वेगवेगळ्या अवस्थांतल्या किती तरी प्रतिमा सुवर्णाच्या होऊन माझ्या डोळ्यांपुढें नाचूं लागतात. ही म्हणते मला पहा, ती म्हणते मला पहा, तुझं शैशव मी पाहिलेलं आहे. तुझं यौवन माझ्या देखतां देखतां विकसलं आहे. इतकंच नव्हे, तर मुग्धत्व अन् यौवन यांच्यामधली अर्धोन्मीलित अशी लावण्यकळा आणि कोणताहि हृद्य भाव दाखवण्याच्या आंत लपवण्याचं तुझं मनोज्ञ लाघवहि माझ्या दृष्टीला चुकलं नाहीं.

घरांत आलीस तेव्हां तुझ्या तोंडावर जणूं लाही फुटत होती. उत्तराला अगदीं ठेक्यांत प्रत्युत्तर. जें माहेरीं तेंच सासरीं. कांहीं दिवस, महिने

असे गेले अन् एक दिवस पाहातों तों तूं आपली मुकी. माहेराहून आलीस ती मुकेपणाचं व्रत घेऊनच. माझ्याशीं तर बोलणं नाहींच; पण माझ्या समक्ष इतरांशींहि नाहीं. पंधराव्या वर्षाच्या सुमाराला पुनश्च तुझ्या ओठाच्या पाकळ्या उघडूं लागल्या. आजूबाजूला कोणी नाहींसं पाहून माझ्या धिटाईच्या प्रश्नाला तुझं लाजरं, तुटक उत्तर मिळूं लागलं. माझे प्रश्न तरी नाजूक असत का? प्रेमशास्त्राला धरून असत का? मुळींच नाहीं. त्या बाबतींत अजून मी अनगडच होतों! मला फक्त तुझ्या मुखांतून निघालेलीं अक्षरं हवीं असायचीं. वासराचं दावं गवाणीवर आहे हें मला चक्क दिसायचं अन् तरीहि मी तुला विचारायचं.

"दावं कुठं आहे?"

तूं एकदम धसका बसल्यासारखं दाखवायचीस. जवळ कोणी नाहीं तेव्हां उत्तर देणं तर भाग. मग तूं म्हणायचीस.

"गवाणीवर."

बस्स! एवढंच. वाक्याला क्रियापदसुद्धा नाहीं. अन् तेवढ्यानंच आपल्या हातून केवढा गोड प्रमाद झाला अशा भावनेनें चंद्रकोर चटकन् ढगाआड लपावी तशी पडवींवरून माजघराच्या दाराआड दडायचीस.

तो एकच शब्द. शब्द कसला; टोपलीभर गुलाबांचं गुंजभर अत्तरच तें. त्याचा सुवास माझ्या हृदयांत खोलवर शिरायचा. तेवढ्या एका शब्दासाठीं माझी आठ आठ दिवस साधना चालायची. मी डोळ्यांत तेल घालून तशा संधीची वाट पहात असायचा. माझी नजर तुझ्यावर अन् धाकट्या भावंडांची माझ्यावर. मी वहिनीशीं कांहीं शाब्दिक 'अतिप्रसंग' करतों कीं काय तें पहाण्यासाठीं त्यांनीं फुकाची हेरागिरी पत्करली होती. तीं लगेच आईकडे कागाळी करणार होतीं. 'मेल्यांनीं लाजाच सोडल्या' म्हणून आई मग दिवसभर आमच्यावर कावणार होती. मी उठून कुठें तरी चालता झालों असतों. चार झाडं आड करून मला तिची पुष्पांजळि

चुकवतां आली असती. पण मला वाटे, तूं कुठं जाशील ? तुला तर चारी प्रहर तिच्या मागेंपुढें सावलीसारखं असायला हवं होतं. तुझी खट्टू मुद्रा मी कशी बघूं ! तुझे व्याकुळलेले डोळे मला काय म्हणतील ! तूं कोणाला आपलं गाऱ्हाणं सांगायचं ! तुझी आई तर दोन कोसांवर राहिली. हें सगळं अवधान ठेवून जवळपास गंपू–नमू कोणी असलं तर मुत्सद्देगिरीनें त्याला दूर पिटाळून आणि आई कुळागरांत गेली आहे खरी; पण शेजारची एखादी साळकाई आजूबाजूनें आपल्यावर डोळे रोखून राहिलेली नाहीं ना, याची बारीक टेहळणी करून मला तुझा तो कल्पवृक्षाच्या फुलासारखा शब्द मिळवावा लागे. अन् तो मिळाला कीं मग आठ दिवस मी धुंद, तृप्त असें. तोच प्रश्न आणि तेंच तुझं उत्तर मी मनांतल्या मनांत घोळवीत राहीं. 'दावं कुठं आहे ?' 'गवाणीवर.'—

नाहीं तर त्या दिवशीं तूं पाहिलंसच. चंदू अन् सूनबाई सारखीं बोलत होतीं, हसत होतीं. याचं वाक्य संपायच्या आंत तिचं वाक्य ओठाशीं येऊन भिडलेलं. त्यांना भोंवतालच्या माणसांची पर्वा नव्हती. वडील-धाऱ्यांची भीड नव्हती. माझ्या आपलं मनांत आलं, संध्याकाळपर्यंत यांना बोलायला कांहीं शिल्लक उरणार नाहीं. बोलण्यांतली अपूर्वाई हीं घालवून बसणार.

मलासुद्धा त्या वेळीं अगदीं असंच वाटे. तुझ्याशीं खूप खूप बोलायला केव्हां मिळेल ? माझे शंभर प्रश्न. तुझीं शंभर उत्तरं. तींहि तुटक, विनक्रियापदांचीं नव्हेत; तर अगदीं सुढाळ. कोणी तिथें येणार नाहीं. कोणाची त्या संवादावर दृष्ट पडणार नाहीं. बोलतां बोलतां तूं हसशील. तुझ्या दंतकळ्या सारख्या चमकत रहातील. तुझ्या पातळ, उभट नाकपुड्या संकोच–विकासांची क्रीडा दाखवतील. ही मेजवानी मला कोणत्या सणाला मिळणार ! मन म्हणे, 'तूर्त तरी तसा संभव नाहीं. सध्या केवळ तिच्या दर्शनावरच समाधान मानून रहा.'

पण तें तरी कुठें सुस्थिर अन् मनसोक्त होतं ! मी पडवीवर आलों कीं तूं हातांतलं काम गुंडाळून माजघरांत रिगायचीस. मी माजघरांत पोंचलों कीं, तूं स्वैंपाकघर गाठायचंस. मीहि मग जिद्दीला पेटून म्हणायचा कीं, मी स्वैंपाकघरांत शिरून दारांतच उभा राहिलों तर तूं काय करशील ! माझ्या अंगाला अंग घसटून बाहेर पसार होण्याचं अग्निदिव्य कांहीं तुला करतां येणार नाहीं. पण अडवणाराला एक वाट तर पळणाराला दहा. तूं मग मांडणीच्या आडोशाला शिंक्याखालीं जीव गोळा करायचीस अन् हा उंदरा–मांजरांचा खेळ पाहून आई माझ्यावर खेकसायची. ' स्वैंपाकघरांत काय पुरून ठेवलं आहे तुझं ! चालता हो बाहेर ! ' ' बघ हं, पुन्हा हाक मारलीस तरी येणार नाहीं ' असा आईला दम भरून मीं बाहेर यायचा. पण त्याच वेळीं मला वाटायचं कीं धांवपळीची साडेसाती ही तुझ्या मागें लावली कोणी ! माझ्या आईनं, तुझ्या आईनं, का हें तुझं स्वयंभू शालीनपण ! खरं सांग मला. तूं त्या वेळीं मला घाबरत होतीस का ! "

" मला नाहीं आठवत. कादिमकाळच्या गोष्टी कशाला हव्यात त्या आतां ! " तिनें गादीवरची सुरकुती मोडीत म्हटलं.

" अग, अशा गोष्टी प्रभु रामानंसुद्धा सीतेबरोबर केल्या आहेत. पुष्पकविमानांत बसून लंकेहून अयोध्येला येत असतां वाटभर रामानं आपल्या भूतकालीन सहजीवनाशीं अशीच स्मरणसांखळी जोडली होती. पण त्याबद्दल सीतेनं रामाला वेड्यांत काढल्याचं कांहीं ऐकिवांत नाहीं. तेव्हां सांगत होतों काय कीं तूं मला भीत नव्हतीस. फक्त लाजत होतीस. अन् जावं तिथें तिथें मला महाग होऊन माझी आतुरता वाढवीत होतीस. तुलासुद्धा वाटायचं कीं माझ्या आवतीं भोवतीं निदान दृष्टीच्या टप्प्यांत तरी असावं. मी तुझ्याकडे पहात होतों त्यापेक्षां तुझी चोरटी नजर अधिक लबाड होती.

मी एखादी कोटी केली, कांहीं विनोदवचन बोललों कीं सासू जवळ

असून सुद्धां तुझं हसूं दबत नसे. तोंडाला पदर लावतां लावतां तुझ्या दंतकळ्या मला ओझरत्या दिसत. पण माझी विशेष आवड जडली होती ती तुझ्या हनुवटीवरच्या गोंदलेल्या हिरव्या, नाजुक तिळावर. तुझ्या तोंडाला पदर लावण्याच्या घाईत तो आधीं झाकला जायचा.

या लपवाछपवींत, चुकवाचुकवींत, जाणून नेणतेपणांत किती गंमत वाटायची त्या वेळीं ! आपण सुखाची चव थेंबाथेंबानें चाखीत होतों. उचलला पेला, लावला तोंडाला असं आपण करीत नव्हतों. मोठ्या माणसांची मर्यादा राखायची तर आपल्याला तसं करणं शक्य नव्हतं. पण त्यामुळेंच आपण एकमेकांच्या अंतर्यामीं भरून उरलों होतों.

तुझे वडील किंवा भाऊ तुला माघारपणाला नेण्यासाठीं आले कीं मला ते दावेदार वाटायचे. मी हिंपुटी होऊन मनांत म्हणायचा, ' उद्या ही जाईल. मग पाटाच्या पाण्यांतून चुबक् 'चुबक् करीत, नेसणं भिजवीत वर जाऊन जास्वंदीच्या झाडाला कोण वळंघेल ? आपला नितळ गुडघा वासराच्या कपाळाला टेकवून त्याच्याशीं रेटारेटी कोण खेळेल ? इतकीं फुलं माझ्या घराभोंवतीं फुलतात; पण आपल्या चटुल नजरेचं फूल मला कोण वाहील ? कुठेंहि असलों तरी हिच्या बांगड्या कुणीकडे वाजतात इकडे माझे कान असायचे. आतां त्या कानांना संतोष कोण देईल ? या घरांत मग मला कोण ? आई, भावंडं, गुरंवासरं, सगळीं आहेत. पण ही या सगळ्या कोंदणांतलं रत्न. नुसतं कोंदण असून काय कामाचं ? छेः ! आईनं हिच्या बापाला चक्क सांगावं कीं ' घरीं अडचण आहे; सुनेला धाडतां येत नाहीं. ' पण 'आईला व्याह्यांकडे आपलं भलेपण मिरवायचं आहे ना ? ती कसं सांगेल ? मीं सांगूं का सासऱ्याला ? म्हणजे झालंच कीं ! आई माझी शोभाच करील.'

नुकताच आईचा माझ्यावरचा एक राग शमला होता. रोज मला टोचणी मिळायची ती अलीकडेच थांबली होती. आई तुला राग भरत असली तरी ती तुझ्यावर माया करी. पण मी तसं कांहीं केलेलं मात्र तिला खपायचं नाहीं. त्या दिवशीं घरांत चार पांच रसाळ फणस पिकले होते. त्यांचीं साटं

घालण्यासाठीं गरे काढून तुम्हीं दोघींनीं ते रगड्यांत वाटले होते. जाड सोनेरी लगद्यानं पातेलं उप्पट भरलं होतं. तो रस पसरण्यासाठीं मी कुंभ्याच्या पानांचा ढीग नुकताच आणून आंगणांत घातला होता. आई मागीलदारीं हातरपटा आणायला गेली होती. एवढ्यांत तूं तें पातेलं उचललंस. दांत आवळूनच तुला तें उचलावं लागलं. पण पडवीच्या पायऱ्या उतरतां उतरतां तुझा हात सुळसुळला अन् पातेलं आंगणांत कलंडलं. अर्धा रस जमिनीभरवण झाला. तुझ्या डोळ्यांत सासू उभी राहिली हें मला समजलं. मी हातानं तुला खूण केली ' पळ घरांत.' तूं माझा आदेश पाळलास. मी त्या रसांत हात भरून घेतले अन् वरवरचा पातेल्यांत जमा करूं लागलों. एवढ्यांत आई हजर !

" हा रांडेच्यांनो ! पातेलं कोणीं सांडलं ? "

" अग मी खालीं आणून ठेवायला निघालों तें निसटलं. "

" तुला सांगितले होते कोणी हे धंदे ! मूर्खा ! माझा सकाळपासूनचा उद्योग मातींत घालवलास. "

आईनें दिलेल्या या सगळ्या नालायकीच्या पदव्या मी छातीवर लटकावणार होतों. पण एवढ्यांत ती चोंबडी नमू पुढें आली अन् तिनं रहस्यस्फोट केला. बायकोला पाठीशीं घालणं हा अपराध आईच्या दृष्टीनं पंचमहापातकांपैकीं एक होता. मग काय विचारतां ? तुझा अन् माझा एकदम उद्धार—

"खरं आहे बाई ! तो प्रसंग माझ्या कसा काळजावर कोरलेला आहे." ती अगदीं मनापासून बोलली.

" पण आई आमची एखादे वेळीं शिक्याच्या मापानं फसायची. माझा पोटांतला कावा तिच्या मुळींच लक्षांत यायचा नाहीं. पाटाकडचा चाफा फुलला होता अन् थावली भांडीं घासतां घासतां तूं मला हळूच म्हणाली होतीस. ' चांफीं ! ' मी लगेच चांफ्यावर चढलों अन् नेसत्या पंचाची ओटी भरून फुलं तोडलीं. पण मी तीं तुला सरळ, उघड देऊं

शकत नव्हतों. मी घरांत जाऊन देवांच्या तबकांत तीं ओततां ओततां साळसूदपणें म्हणालों.

“ आई गे ! देवासाठीं आणलीं आहेत. ”

“ आज बरी देवाची आठवण झाली तुला. ” असं म्हणत आईनं लाकडांचा भारा स्वैंपाकघरांत आपटला. मला राहून राहून भीति वाटायची कीं आईनं माझ्या बोलण्याचा वाच्यार्थ घेऊन तीं देवाला वाहिलीं तर ! माझा धूर्तपणा लक्षांत आला असता तर तिनं नक्की तसं केलं असतं. पण त्या दिवशीं माझा हेतु सफल झाला. आईनं स्वहस्तें तीन वेण्या करून त्या तुम्हां नणंदाभावजयांना माळल्या. चार दोन उरलीं तेवढींच देवपुजेला लावलीं. तूं त्या वेणीनं सजलीस, मला श्रमांचं सार्थक वाटलं, हें सगळं ठीक. पण त्या वृक्षारोहणांत माझं पोट चांगलंच खरचटलं होतं, त्याची चुरचुर कांहीं थांबली नाहीं. ती केव्हां थांबली ठाऊक आहे ? तूं सगळ्यांच्या नजरा चुकवून तेलाची वाटी पुढें आणून ठेवलीस तेव्हां ! ”

“ बरंच लक्षांत राहिलं आहे कीं तुमच्या ! ”

“ तुला सांगूं ? जाणून केलेली लहानशी गोष्टसुद्धां हृदयांत ठसून रहाते. तुझ्या अशा त्या वेळच्या कितीतरी गोष्टी माझ्या मनाच्या कप्प्यांत सांठवून ठेवलेल्या आहेत. अन् म्हणूनच तूं माहेरीं जायला निघालीस कीं मला कालिदासाच्या यक्षासारखं व्हायचं. ”

“ पुरे, पुरे ! नका सांगूं. लग्न झालं नाहीं तों चार दिवसांत सासूबाईंना अगदीं तावातावानं म्हणाला होतांत, ‘ हिला आत्ताच्या आत्ता माहेरीं पाठवून दे. पुन्हा कधीं घरांत आणूं नकोस ’...... ”

“ अग होय, मलाहि तें स्मरतं. पण त्या वेळीं मी होतों केवढा ! अवघा चौदा वर्षांचा. म्हणजे तेरावं संपून नुकतंच चौदावं लागलेलं. एवढ्या लहान वयांत आई मला चतुर्भुज करायला निघाली होती. पण तिचा तरी दोष काय ! मुलींच्या बापांनीं तिची सासू होण्याची आकांक्षा चाळवायला माझ्या

एवढ्या वयांतच सुरुवात केली होती त्याला ती तरी काय करील ! त्यांच्या घरीं मुली घोडनवऱ्या वाढल्या होत्या ना ! कोणाला दहावं वर्ष, कोणाला अकरावं तर क्वचित् एखादीला बारावंसुद्धा. आपण हेरलेला मुलगा लंगोटी टाकून पंचा केव्हां नेसायला लागतो, याकडे त्यांची काकदृष्टि असायची. हळू हळू वास काढीत चार चार कोसांवरून वधूपिते यायचे.

असाच एक दिवस एक गृहस्थ आमच्याहि पडवीवर चढला. कोण तो ठाऊकच आहे तुला. मी गेलों होतों गुरं आणायला ओढ्याच्या कांठावर. एक पंचा नेसलेले, दुसरा पंचा दुहेरी डोक्याला वेढून शेंडी बाहेर टाकलेले, दीड महिन्याची हजामत वाढलेले, जानवं लांब होत असल्यामुळें त्याचा एक फेरा गळ्याभोंवतीं वेढलेले, एवंगुणविशिष्ट अस्मादिक नुकतंच मोचेमाडकरांच्या नाटकांत ऐकून पाठ केलेलं एक पद मुक्तकंठानं आळवीत कल्याणी गाईच्या मागून घरीं येत होते. एवढ्यांत गंप्या आडवा आला.

" तुला तावडतोब आईनं घरीं बोलावलं आहे. "

" मग मी काय बाजाराला चाललों आहे ! "

" तें मला ठाऊक नाहीं. मी निरोप सांगितला. अन् हें पहा, मागील दारानं जायचं हं ! "

" कां रे बाबा ? "

" आहे एक जम्मत ! "

घराजवळ जातों तों कुंपणाआड आई उभीच होती. तिनं शुक् शुक् करतांच माझं पद गळ्यांतल्या गळ्यांत गोठलं. मागीलदारानं घरांत घेऊन ती मला हलक्या आवाजांत बोलली,

" पाणी ठेवलंय् तिथें. हात पाय स्वच्छ धू. ही पैरण अंगांत घाल. ही बाबळी डोक्यावरून गुंडाळ. डोक्याचा 'बकरा' बघ केवढा वाढला आहे तो ! मेल्याला सतरादां सांगितलं, वाळपईला जाऊन कापणी करून ये. "

" वाढूं दे माझा बकरा वाढला तर. " मी जरा आवाज चढवला. आईनं लगेच नाकावर बोट ठेवलं.

" चूप, अकलेचे तारे तोडूं नको. बाहेर ऐकतील ते. "

" ते ? ते कोण ? "

" तुला पहायला आले आहेत. "

त्यानंतर सुमारें दहा मिनिटांनीं आईनं माझी उत्सवमूर्ति दाराआडून बाहेर ढकलली. मी बांकावर बसायला निघालों तर आईनं खुणेनंच निषेध केला. मी खालीं खांबाला टेकून बसलों. आलेला गृहस्थ शेंद्रीवर बसून चंची सोडीत होता त्यानं थोडा वेळ माझं 'ध्यान' निरीक्षून मला प्रश्न केला.

" नांव काय तुझं ? "

" गोपाळ सखारामभट्ट वझे. "

" ठीक. काय शिकला आहेस ? "

" शिक्षा, ज्योतिष, छंद, निघंट, अष्टाध्यायी, रुद्र, सौर, त्रिसुपर्ण जानव्याचा मंत्र — "

" एक सूत्र म्हणतोस का पाणिनीचं ? -बुभुक्षणकठाजिल— "

मीं तें मालगाडीसारखं खडबडीत सूत्र एका दमांत म्हणून टाकलं. आतां मला कळतंय् कीं त्यांनीं तेंच सूत्र मला कां म्हणायला लावलं तें. त्यांना माझा वर्णोच्चार स्पष्ट होतो कीं नाहीं, जीभ चांगली वळते का नाहीं, तें पहायचं होतं. 'आणखी कांहीं येतं का' असा पुन्हा त्यांनीं प्रश्न केला त्यावर मी म्हटलं.

" हो, मोचेमाडकरांच्या नाटकांतलीं पदं पण येतात. 'थाटमाट सदानिं नवा,' 'घेउनि ये पंखा—' अशीं कितीतरी. म्हणूं एखादं ? "

पण अरे बापरे, आईनं आंतून केवढे डोळे केले ! तिला वाटलं, शेवटीं पोरानं गुण पाघळलेच. मुलगा नापसंतीचा शिक्का घेणार. पण त्या गृहस्थानं तें मनावर घेतलेलं दिसलं नाहीं. पोरपण ही काय चीज आहे तें आईपेक्षां त्याला अधिक कळत असावं.

माझं लग्न ठरलं हें माझ्या आधीं शेजाऱ्यांना कळलं. मी शेतवाडींत

जातों तर सगळे माझ्याकडे रोखून पहायला लागले. ‘ या नवरदेव ! ’ एकजण खोच्यानें मेर खांपावीत म्हणाला. मी एकदम लाजलोंच.

“ आईनं याला नवरी मात्र छान पाहिली बरं का ! याच्यापेक्षां चार आंगळं उंच अन् अंगानं हीऽऽ ! ” दुसऱ्यानं आपल्या भुजा रुंद करून दाखवल्या. तिसरा होताच त्याला शेव लावायला.

“ अरे, वाईट काय झालं ? याला कडेवर घेऊन विठ्ठलभटजींच्या घरीं पोंचवील ती संथा म्हणायला. ”

माझ्या डोळ्यांपुढें एक काल्पनिक मूर्ति उभी राहिली. अरिष्ट अन् अगडधूत. लग्नाला मी घाबरलों नव्हतों; पण या दुर्दैवाला घाबरलों. मला वाटलं, आईला कुळागर शिंपायला एखादी तगडी बाई हवी म्हणून तिनं माझ्या लग्नाचा बेत केला. आतां आई धाकांत ठेवतेच; उद्यां तीहि जातां येतां चिप् चिप् करील. इकडून आड, तिकडून विहीर. आईला स्पष्टच सांगावं कीं ‘ मला लग्नच करायचं नाहीं. ’ पण ती ऐकणार थोडीच. कान धरून मला बोहल्यावर उभा करील. तेव्हां आतां काय ! ‘ आलिया भोगासी—’

अंतरपाट धरला अन् पलीकडच्या बाजूला कोणीतरी येऊन उभं राहिलं आहे असं समजतांच खरोखर माझ्या अंत्रमाळा उडल्या. पण तो दूर झाला मात्र; माझ्या तोंडून एकदम मोठ्यांदा उद्गार निघाला. ‘हुडुत् तिच्या——!’ सगळा मांडव खळखळून हसला. सासूबाईला लाजल्यासारखं झालं. आई टवकारून पाहूं लागली. पण माझ्या छातीवरचं केवढं ओझं उतरलं याची जर त्या इतरेजनांना कल्पना असती तर ते मला खचित हसले नसते. ”

“ लोकांनाच कशाला; मलासुद्धां हसूं आलं होतं तुमच्या त्या अत्रवीच-पणाचं. ” ती याहि वेळीं पोटभर हसून घेत म्हणाली.

“ मी त्या वेळीं मनांत काय म्हणत होतों, ठाऊक आहे का ? ही सिताचवरीची ठुसकी वेल मला काय उचलून घेणार ! मीच हिला खांद्यावर

बसवून मांडवभर नाचवीन. तूं लठ्ठ नसलीस तरी धिटुकली मात्र होतीस बरं का ! उभी होतीस तरी माझ्याकडे टुकु टुकु पहायचीस. अन् बसलीस तरी तेंच. मागच्या करवल्या अधून मधून तुझी मान खालीं दाबीत. दहा वर्षांच्या पोरीला लाजायला शिकवीत. अन् त्या प्रयत्नांत अपयश आलं कीं एकमेकींना नेत्रपल्लवी करून गालांतल्या गालांत हसत. मला नव्हे; तुला.

पण माणूस लाजतं केव्हां ? ज्या वेळीं अंतरांतले अगम्य, अननुभूत, दृद्य, रसयुक्त भाव लपवण्याच्या द्वारें उघड करायचे असतात तेव्हां. तुझ्या हृदयांत अजून तसलं कांहीं उगवलंच नव्हतं. तुझी पाटी अजून कोरी होती. तिच्यावर अनंगाचीं मुळाक्षरंसुद्धां अजून उमटलीं नव्हतीं. एवढ्या जन-संमर्दात आपल्यासमोर खेटून बसलेला, नव्या कोऱ्या पोषाखाचा, बाशिंगाचे गोंडे हालवणारा ' नवरा ' नांवाचा कोणी एक प्राणी, या एकाच कुतू-हलाच्या भावनेनं तूं माझ्याकडे बघत होतीस.

मला मात्र त्याच वेळीं तुझ्या गोऱ्या हनुवटीवरच्या निळ्या तिळानं वेध लावला. वधूवस्त्राच्या पिवळ्या बुरख्यांत तूं मला जत्रेंत विकत घेतलेल्या पुस्तकांतल्या ' गुलबकावली ' सारखी वाटलीस. मीं तेव्हांच मनाशीं म्हटलं, आमच्या आईला आपली नमू म्हणजे नक्षत्र वाटते. नमूला पण ऐट आहे आपल्या सुंदरपणाची. आतां हिला नेऊन तिच्यापुढें उभी करतों अन् सांगतों. ' नक्षत्र तूं नव्हेस; नक्षत्र ती ही. इतउप्पर माझ्यापुढें रुबाब करूं नको. '

संध्याकाळीं ' ऐरिणी ' च्या वेळीं आईनं तुला कोरी साडी चोळी नेस-वली अन् दागिन्यांनीं मढवली, तेव्हां तर मला एकदम तुझ्याबद्दल अभिमान वाटला. नंतर तुला नातेवाईक शिष्ट बायकांच्या मांडीवर बसवण्याचा कार्य-क्रम सुरूं झाला. तूं बसलीस कीं तिला विचारण्यांत येई, ' जड का हलू ! ' जड म्हटलं तर अपमान. हलू म्हटलं तर तुच्छता. मग ती ' मध्यम ' असं उत्तर देई अन् तुझ्या हातावर साखरेची चिमूट ठेवी. ती तोंडांत

टाकून तूं उठलीस कीं पुन्हां दुसरीच्या मांडीवर. पुन्हां तोच प्रश्न अन् तेंच उत्तर. तशीच साखरेची चिमूट. मला तुझा हेवा वाटला. ‘ ह्या खासा न्याय. लग्न माझं अन् साखर खाते ही ! ’

वरात निघायच्या वेळेला सगळ्या बायकांनीं डोळ्यांना पदर लावले. तुझा बापसुद्धां गहिंवरला. मला एकदां वाटलं कीं त्याला म्हणावं, ‘ तुम्ही कशाला काळजी करतां ? मी आहें कीं आतां. ’ पण नाहींच जमलं तें. सगळीं माणसं तुला रडवायचा प्रयत्न करीत होतीं. तुझ्या डोळ्यांतल्या दोन आंसवांसाठीं तहानलीं होतीं. पण तूं बहाद्दरीण अगदीं कोरडीच राहिलीस. माझ्या आधीं तुझा पाय पुढें. आंगणाच्या बाहेर शृंगारून उभा केलेला घोडा दिव्याच्या प्रकाशांत तुझ्या डोळ्यांत भरत होता. त्याच्यावर स्वार होऊन चांदण्याच्या बरसातींत न्हात तूं माझ्या घरीं येणार होतीस. तुझ्या वांट्याला तो कौतुकाचा, उल्हासाचा सौभाग्ययोग होता. मग कां तूं रडशील !

“ अग, आई–वडिलांना ‘ येतें ’ म्हणून तरी सांग. ” कोणीतरी तुझी काकी मामी तुला म्हणाली. तूं जाता पाय किंचित् स्थिर केलास, मान मागें वळवलीस अन् म्हटलंस.

“ बाबा, येतें. आई, येतें हं ! ”

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कोणत्यातरी आतेमामेसासूनें तुला सासुरवासांतला पहिला पाठ दिला. ‘ ह्या सासूबाई, हा गंपूभावजी, ही नमूवन्सं, ही धाकट्यावन्सं. ह्या सगळ्यांना ‘ अहो ’ म्हणायचं, बहुवचनानं बोलायचं, समजलं ना ? ’ पण या सगळ्या मंडळींत मी वगळला गेलों. मला काय म्हणायचं तें तुला कोणींच सांगितलं नाहीं. तुला तर तें प्रथम कळायला हवं होतं. मग तूंच आपलं डोकं चालवलंस. दोन दिवसांनीं सकाळीं आईनं तुला फुलं तोडून आणायला सांगतांच तूं म्हणालीस.

“ नवरेकाका काढतोय् फुलं. ”

कोणत्याहि बाहेरच्या मोठ्या माणसाला, शेजाऱ्यापाजाऱ्यांना ‘ काका ’ म्हणायचं हें तुला बाळकडू मिळालेलं. तेव्हां तूं ती उपाधि माझ्या हृदयाला चिकटवून टाकलीस. जसा गणूकाका, वासूकाका, बाबूकाका तसा नवरेकाका. खरं म्हणजे त्या शब्दानं तूं माझा आदरच केला होतास; पण भोवतालचीं सगळीं माणसं तुला खो खो हंसलीं. आईनं तुला तिखट शब्दांत दम भरला. ‘ पुन्हां असं बोलायचं नाहीं बरं का ! नवरेकाका काय ! गाढव कुठली. ’ पण आईनं फक्त निषेधच केला, विधि काय तो सांगितला नाहीं. तुझी जिज्ञासा तशीच राहिली. त्या नव्या बिनमायेच्या माणसांत तूं गोरंमोरं तोंड करून बसलीस.

हा सगळा विनोदी नाट्यप्रवेश पडवीवर माझ्या डोळ्यांआड झाला होता. मला त्यांतलं कांहींच ठाऊक नव्हतं. मी फुलांची परडी भरून आंगणांत येतों तों गंप्या अन् नमी माझ्याभोंवतीं येऊन गिल्ला करूं लागलीं. ‘ नवरेकाका, नवरेकाका — ’

“ मुस्काटींत खाशील नमे ! नवरेकाका काय ! ”

“ मुस्काटींत दे तुझ्या बायकोच्या. तिनंच तुझं नांव नवरेकाका ठेवलं आहे. नवरेकाका, नवरेकाका — ”

मी फुलांची परडी आंगणांत फेकली अन् घरांत धांवलों. माझा भयंकर अपमान झाला होता. मला भलतीच चीड आली होती. तूं माजघर अन् स्वैंपाकघर यांच्यामधल्या उंबरठ्याजवळ आंग चोरून उभी हेतीस. मी गेलों अन् दोन रपाटे तुझ्या पाठींत घातले. आईनं पुढें होऊन बाजूला ओढलं नसतं तर आणखी दोन घातले असते. मी खसवसत आईला बोललों.

“ हिला आत्ताच्या आत्ता माहेरीं पाठवून दे. पुन्हां कधीं घरांत आणूं नको. मला नको ही बायको. ”

तूं किती तरी वेळ भिंतींत तोंड खुपसून रडत होतीस. संध्याकाळीं आमच्या मागील दाराजवळून वहाणाऱ्या पाटाजवळ मी पाथर हालवण्याचं

काम करीत होतों. तूं हळूच येऊन भिंतोडीला उभी राहिलीस. मी तुला पाहिली; पण पाहिल्यासारखं दाखवलं नाहीं. थोडा वेळ वाट पाहून तूं ओठ हालवलेस.

" तूं मला असाच मारणार आहेस का रे ? माझी आई तर म्हणत होती कीं, ' माझ्या बायाचा नवरा तिला फुलांत घालून ठेवील. ' माझं काय चुकलं ? "

" चुकलं म्हणजे ! अगदीं सपशेल चुकलं. नवरेकाका काय—"

" मग काय म्हणूं तुला ? "

" हां, असं विचार. मला ना ?...काय बरं म्हणशील...अं...अं..."

" बघ. तूं माझ्यापेक्षां मोठा असून तुलासुद्धा ठाऊक नाहीं. "

हा घाव मला वर्मी लागला. छंद, निघंट, अष्टाध्यायी म्हणून ' विद्वान् ' झालेल्या मला तूं अगदीं ठोंब्या ठरवलं होतंस. उतरलेल्या चेहऱ्यानं तुझ्या-पुढून निघून जाण्याशिवाय मला गत्यंतर नव्हतं..."

माझी कथा इथवर येते तों कुठल्या तरी घड्याळांत एकाचा ठोका पडला. मी बोलणं थांबवलं अन् कुठें तरी शून्य नजरेनें पहात राहिलों. त्यावर ती दानावर दक्षिणा ठेवावी तसं बोलली.

" झाली एकदा माझ्या मूर्खपणाची उजळणी ? आज कशासाठीं काढ-लंत हें सगळं ? "

" कारण असं कांहींच नव्हतं. आला उमाळा, दिली मोकळी वाट करून ! चंदूच्या लग्नाचा विचार करतां करतां हे सगळे पूर्वानुभव आठवले. आपण ज्या एका अबोध प्रेमाची गोडी घेतली, अनेक धाग्यांनीं जीवनांत जीवन गुंफलं, एकमेकांच्या जीवातळीं जीव आंथरला, तें भाग्य कांहीं सून-मुलग्याच्या वांट्याला येत नाहीं. तीं निब्बर झालीं आहेत. त्या वयोमर्यादेच्या पलीकडे गेलीं आहेत. तीं समंजसपणें वागतील, देखावा उत्तम करतील,

आपल्यापेक्षां 'तत्त्वज्ञान' अधिक बोलतील; पण एकाच्या पायांत कांटा अन् दुसऱ्याच्या डोळ्यांत आसूं—"

माझा शब्द हळू हळू जड येऊं लागलेला पाहून ती उठली अन् दिवा मालवतां मालवतां म्हणाली.

"झोपा बघूं आतां मुकाट्यानं! फार हळवे झालां आहांत तुम्ही आज!"

---

# गोपी ५

'जगेन, वांचेन तर शिमगा नाचेन' अशी एक म्हण आहे. मी त्या प्रसंगांतून, त्या काळरोगांतून, वांचलों म्हणून आज ही गोष्ट सांगायची संधि मला मिळत आहे. कसा वांचलों तें सर्वसाक्षी परमेश्वराला माहीत. कदाचित् त्या गोपीलाहि माहीत असेल. ती आज माझ्यापासून कितीतरी योजनं दूर आहे. आहे कीं नाहीं, हें सुद्धां आतां मला माहीत नाहीं. असली तरी तिची माझी भेट होण्याचा संभव नाहीं. पण असं तरी कां म्हणावं! ती मला रोज भेटते. रोज आपल्या त्या कणवपूर्ण डोळ्यांनीं मला न्याहाळते. ती कांहीं बोलत नाहीं, बोलूं शकत नाहीं. तिच्या डोळ्यांतल्या त्या बाहुल्या जी निःशब्दाची भाषा बोलतात त्यावरून काय समजत असेल तर समजून घ्यावं.

मला तें समजतं. त्या वेळींहि समजलं होतं. पण तिनं टाकलेल्या समस्येची पूर्ति मला करतां आली नाहीं. समस्येचा तो चौथा चरण अजूनहि तसाच हवेंत लोंबकळतो आहे. समरसतेमुळें तिची समस्या तीच आतां माझीहि झाली आहे. मीहि शास्त्र–पुराणांत तिचं उत्तर शोधतों आहें. मानवी हृदयांत प्रेमाचा अंकुर कां उगवावा? त्यानं जवळ जाण्याची, सर्वांगीं आच्छादून टाकण्याची इच्छा कां धरावी! मधुर अन् कोंवळ्या प्रेमानें तीव्र बोचणी कां द्यावी? प्रेमाचं फळ काय? साध्य काय? मानवी हृदयांतल्या प्रेमभावनेची ही सातपेडी वेणी कोण उलगडील ...!

'पुराणतीर्थ' ही पदवी घेतल्यानंतर पहिल्याच चातुर्मासासाठीं मी त्या गांवीं गेलों होतों. तालुक्याचं लहानसं गांव; पण तिथें सावकार–जमीनदार

बरेंच असल्यामुळें प्रांतीला चांगलं होतं. मीं मोठ्या वशिल्यानं तें मिळवलं होतं. पं. अर्जुनवाडकर, पं. भारतीबुवा अशा नामांकित पुराणिकांनीं तिथें आलटूनपालटून बरेंच चातुर्मास केले होते. त्या विठ्ठलमंदिरांतले श्रोते ऐकून ऐकून बहुश्रुत झाले आहेत, बरेंच चोखंदळ झाले आहेत, हेंहि मला समजलं होतं. अर्थात् माझ्यावर फार मोठी जबाबदारी होती. तिथल्या श्रोत्यांवर छाप बसली तरच मला चार पैसे मिळणारे होते. ही पहिलीवहिली मोहीम यशस्वी होण्यावरच माझ्या भावी आयुष्याची. मदार होती.

देवस्थानाच्या पंचांनीं उघडून दिलेल्या एका प्राकारांतल्या खोलींत मी माझं बिऱ्हाड थाटलं. बिऱ्हाड म्हणजे मी अन् माझे हातपाय एवढी मंडळी. त्या गांवांत मी प्रथमच पाय ठेवीत होतों. तिथें माझं कोणीहि ओळखीदेखीचं नव्हतं. पहिल्या रात्रीं अंधाराच्या सोबतीनंच झोपलों. आणि आतां यापुढें चार महिने, दिवसा प्रकाश आणि रात्रीं काळोख हे दोघे मला आलटूनपालटून सोबत करणार होते. सकाळीं उठून पाहिलं, माझ्यासाठीं चूल सारवलेली होती. लांकडं, चार भांडींकुंडीं अन् एका दिवसाचा शिधा एवढी सामग्री जय्यत होती.

पण माझ्या मनांत स्वैंपाकाचा विचार येण्यापूर्वीं पुराणाचा प्रथम आला. मी इथं कांहीं केवळ भोजनभाऊ म्हणून आलों नव्हतों. मला पुराण सांगायचं होतं, लौकिक मिळवायचा होता अन् पैसाहि संपादायचा होता. माझ्या जीवनव्यवसायाची 'भवानी' चांगली व्हायला हवी होती. मी येतांना वडिलांची शाल आणली होती; पण जातांना बहुमानानं अंगावर पडलेली स्वतःच्या पुण्याईची घेऊन जावी, अशी महत्त्वाकांक्षा मीं मनांत धरली होती. द्रव्य मिळेल, वस्त्र मिळेल, पात्र मिळेल; आणि कोणीं सांगावं, माझ्या लग्नाच्या वेळीं नववधूच्या अंगाखांद्यावर घालतां येईल असा सोन्या-मोत्याचा नग, कोण्या शेठसावकाराच्या गृहलक्ष्मीकडून मिळणारच नाहीं म्हणून! 'स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यम्—!'

आषाढ शुद्ध दशमीला पुराणाचा प्रारंभ होता. मीं महाभारत सांगायचं ठरवलं होतं. दार लावून घेऊन मी त्याचं पूर्वावलोकन करीत बसलों होतों. थोड्याच वेळांत तें विठ्ठलाचं राऊळ नादावलं. स्त्री–पुरुष श्रोत्यांचा संमिश्र आवाज माझ्या कानावर येऊं लागला. ' पुराणिकबुवा तरुण अन् गोरागोमटा आहे म्हणे ! ' माझ्या खोलीपुढच्या दारांतून आंत शिरतांना कोणीतरी एक चौकस बाई, आपल्या सोबतिणीला बातमी देत आंत शिरत होती, ते शब्दहि माझ्या कानीं पडले.

' मंडळी जमायला लागली तर ! चला आतां. उचला पोथी. ' मीं स्वतःलाच म्हटलं. दाराला कडी लावून पुढें पाऊल टाकतांना माझं काळीज कसल्या तरी अनामिक भीतीनं धडधडत होतं. कर्वतकांठी धोतर पायघोळ नेसलेला, उपरण्यावरून हिरवी शाल पांघुरलेला, कपाळीं रेखीव आडवं गंध लावलेला, डाव्या कांखेला पोथी अन् उजव्या हातांत घड्याळ घेतलेला शास्त्रीबुवा नटवेष करून रंगभूमीवर जात होता. हें सगळें ठीक होतं; पण मुद्रेवर रुबाब होता कीं नाहीं तें देव जाणे ! मीं मनांत म्हटलं, आजवर माझ्या लेखी परीक्षा पुष्कळ झाल्या; पण तोंडी परीक्षा आहे ती आज !

मी सभामंडपाच्या दारांत पाय ठेवला आणि आंत एकदम स्तब्ध झालं. तिथल्या शंभर डोळ्यांनीं एकाएकीं माझा वेध घेतला. माझ्या गतीला अनुसरून त्यांच्या नजरा मागं–पुढं होऊं लागल्या. मी प्रथम गाभाऱ्याशीं जाऊन विठ्ठलापुढें डोकं टेकलं. नंतर परत फिरून मध्यभागीं मांडलेल्या व्यासपीठाजवळ आलों. पोथी चौरंगावर ठेवून, अनेक प्रभावी वक्त्यांनीं गाजवलेल्या त्या व्यासपीठावर आसन घालतांना मला दचक वाटल्यावांचून राहिला नाहीं. खालच्या मानेनंच मी मंगलाचरण म्हटलं आणि तें संपल्यावर एकवार घसा साफ करून मोठ्या प्रयासानं सुरुवात केली.

" वैशंपायन म्हणतात, राजा जनमेजया—"

हळूहळू मी मोकळा होत चाललों. घागरींत पाणी भरलं जावं तसतशी हवा बाहेर पडावी, त्याप्रमाणें जसजसा धीर भरूं लागला तसतसा संकोच

उडत चालला. मी रंगलों, कथेशीं समरस झालों. देवाकडची दृष्टि श्रोत्यांवर वळवतांना मला दिसलं, कीं श्रोतेहि उदासीन नाहींत. या पोरसवदा पुराणिकाला पहिल्याच दिवशीं मान डोलवायाची नाहीं, अशा आढ्यतेनें खालमुंडी घालून बसलेले कांहीं ‘ वृद्ध कपि ’ सोडले, तर बाकीच्या श्रोत्यांनीं कुतूहल दर्शवलं. हा पुराणिक चातुर्मास निभावून नेईल हा विश्वास त्यांच्या चेहऱ्यावर मला त्याच दिवशीं दिसला. त्या दिवसाचं पुराण संपवून ‘ श्रीकृष्णार्पणमस्तु ’ म्हणतांना एका महान् दिव्यांतून पार पडल्याचा आनंद मी उपभोगला.

दुसऱ्या दिवशीं मी देवळांत गेलों, तो अर्जुनाच्या रणोत्साहानं. कालच्यापेक्षां आज श्रोत्यांची संख्या अधिक होती अन् ‘ कांकणभर ’ सरस होती. इरकली, महेश्वरी, इंदुरी अशा अनेक पेठांच्या रंगांचं अन् कांठपदरांचें तें नजरेंत भरण्याजोगं प्रदर्शन होतं. आजहि मंगलाचरण म्हणतांना माझी दृष्टि जमिनीला खिळली; पण ती सभाकंपामुळें नव्हे, तर व्यासपीठापुढच्या रांगोळीमुळें. त्या वेलपत्तींत असा कांहीं डौल होता अन् ती रेषा इतकी सम आणि सफाईदार होती कीं अथपासून इतिपर्यंत न्याहाळल्यावांचून नजर माघारी फिरूंच नये.

मी विचार करूं लागलों. कोणत्या सीमंतिनीच्या चिमटींतून ही ‘ सुरेखा ’ अवतरली असेल ? कोण ही कलाचतुर नारी ? खांबाला टेकून मला तिरकी बसलेली ही गोटपाटल्यांची पोक्त नितंबिनी ? हातभर उंचीच्या मधल्या कठड्यावर डाव्या हाताचा कोपर अलगद टेकून अन् डावंच अंग झुकवून बसलेली ही मोत्यांच्या कुड्यांची महिला ? माझ्या उजव्या हाताला आपले वाटोळे डोळे माझ्यावर जडवून पुढच्या कथाप्रसंगाला उत्कंठित झालेली ही सांवळ्या तुकतुकीत तोंडाची युवती ? का तिच्या पलिकडची, तळहातावर हनुवटी ठेवून आपल्या कृशतनूचं अंतर्गोल वर्तुळ करून बसलेली ती गौरांगी ? कोण...कोण असेल बरं ?...

पुराण सांगतां सांगतां मी त्या रांगोळीकडे वारंवार पहात होतों. पण माझं

हें नेत्रसुख पाठीमागून आलेल्या कांहीं पुरंध्रींना पहावलं नाहीं. त्या व्यासपीठापुढें आल्या, आपल्या हातांतल्या फुलपात्रांतले तांदूळ समोरच्या परातींत ओतण्यासाठीं वांकल्या अन् आपल्या जागेवर जातांना ती कलापूर्ण रांगोळी बेदरकारपणें तुडवीत, तिला वेडेवांकडे फराटे ओढीत निघून गेल्या. दूरचं सोडाच; पण पायाखालचंहि त्यांना दिसलं नाहीं. दुसऱ्या दिवशीं, तिसऱ्या दिवशीं, पुन्हां तशीच रांगोळी अन् तशीच तिची तुडवणूक. एकीनं परिश्रमपूर्वक रचावं अन् इतरांनीं तें सहजपणें फाफसावं. मला त्या गोष्टीचं वाईट वाटलं. एक दिवस विषयांतून विषय काढून मी श्रोत्यांना सुनवलं.

"–कला ही दैवी देणगी आहे. ती आत्मराजांतून प्रकट होते आणि आत्म्यालाच सुवासित करते. प्रत्येकाचा हात कलावंताचा नसेल; पण मन कलारसिक असायला कोणती हरकत आहे? कलेचा बोज राखण्यांत, अन् तिचा सांभाळ करण्यांतहि आपण अर्धे कलावंत होऊं शकतों. आतां हें रांगोळीचंच उदाहरण पहा..."

पुढच्याच दिवशीं मला कळलं, कीं हें रांगोळीप्रकरण गांवांत बरंच गवगवलं आहे. बायकांना ती रांगोळी पसंत होती का नाहीं तें कोण जाणे! पण रांगोळी घालणारी मात्र मुळींच पसंत नव्हती. त्याचाच परिणाम म्हणून कीं काय नकळे; पण त्या दिवशीं व्यासपीठापुढची जागा कोरी राहिली. तीं कोंवळीं अष्टदळं, तीं ठिपक्यावरचीं कमळं, कोणाच्या तरी निषेधामुळें उगवलींच नाहींत, उमललींच नाहींत. मी नाराज झालों; पण त्यावर पुन्हा प्रवचन झोडलं नाहीं. त्या अज्ञात कलावतीची कड घेऊन मी काय म्हणून श्रोत्यांना दुखवावं! मी कांहीं स्वार्थावर धोंडा घालण्यासाठीं तिथें गेलों नव्हतों.

पुराण आटोपल्यावर मी खोलींत जाऊन कांहींतरी वाचीत बसलों होतों. बाहेर जोराची सर पडत होती. रस्त्यावर ओहळ वहात होते. त्यांचा खळखळ आवाज कानांवर येत होता. एवढ्यांत माझ्या खोलीचं किलकिलं दार आवाज

न करतां उघडलं. दारांत एक वृद्ध स्त्री दिसली. ती माझ्या परवानगीची वाट पहात होती. मी ' या ' म्हणतांच ती आंत येऊन माझ्यासमोर बसली. क्षणभर मी नुसतं तिच्याकडे पाहिलं. तिनं एक पेढेघाटी पितळेचा डबा पदराखालून बाहेर काढला अन् माझ्याकडे सरकवला. मी विचारलं.

" काय आहे तें ? "

" चार लाडवाच्या गोळ्या आहेत. "

" कशाला एवढी तसदी घेतलीत ? "

" तसदी कसली त्यांत ? माझी मुलगी म्हणाली, ' पुराणिकबुवा एकटे आहेत. हातानं करून जेवतात. कसं काय जमत असेल कोण जाणे त्यांना. ' तिनंच केले आहेत ते. भुकेच्या वेळीं एखादा तोंडांत टाकून पाणी प्या. मी कधीं कधीं जेवायलाच बोलावणार होतें; पण आमच्या हातचं चालायचं नाहीं तुम्हांला. आम्ही सोनार आहोंत. "

ती थोडा वेळ थांबली. तिनं माझा अंदाज घेतला अन् दाराकडे तोंड वळवून हांक मारली, " गोपी, आंत ये कीं ! "

एवढा वेळ, आणखी एखादी व्यक्ति दाराबाहेर असेल याची मला कल्पना नव्हती. गोपीनं आईची आज्ञा अंमलांत आणली. पण आंत येतांच ती बसली मात्र नाहीं. भिंतीशीं संकोच करून उभं रहाणंच तिनं पसंत केलं. तिच्याकडे बोट करून ती बाई सांगूं लागली.

" ही माझी मुलगी. हीच देवळांत रांगोळ्या काढीत होती. पण बायकांनीं कसा कांव्याचा नायटा केला तें तुमच्या कानावर आलंच असेल. बायका म्हणतात, ' हिला एवढा चोंबडेपणा हवा होता कशाला ? जशी कांहीं हीच एकटी जगांत रांगोळ्या काढणारी. अन् पुराणिकबुवा मारे तिची कड घेतात. ' पांच पोरांत हें एक लेकरूं जगलं. पोरीला हौस फार; पण नशीब फुटकं... "

गोपीनं डोळ्याला पदर लावला. मी तिच्याकडे एकवार पाहिलं. होय; खरंच

तिचं नशीब फुटलेलं होतं. जमिनीवर रांगोळीचे प्रमाणबद्ध ठिपके मांडणाऱ्या तिच्या कपाळावर मात्र हवा तो ठिपका नव्हता. ऐन तारुण्यांत, जीवनाच्या रसरसत्या काळांत, दुर्दैवानं तिला सुखसौभाग्याच्या ताटावरून ओढून काढलं होतं. रांगोळी काढणाऱ्या कोणत्याहि स्त्रीचं कल्पनाचित्र माझ्या डोळ्यांपुढें नव्हतं. पण ती ही असेल असं मात्र मी कधींच कल्पिलं नव्हतं. गोपी वर्णानं 'कृष्णाची बहीण' तर होतीच; शिवाय नाकीं–डोळीं अगदींच सामान्य. कोणताहि अवयव डोळ्यांत भरण्यासारखा नसलेल्या हिच्या आकारांत कलागुण कसे आले याचं मला आश्चर्य वाटलं. अन् त्याहीपेक्षां दुसरं आश्चर्य वाटलं तें हें कीं, अशा निराधार, नीरस, दाहक अवस्थेंत ते तिच्या अंगीं टिकले कसे !...

गोपीची आई कांहींतरी बोलत राहिली होती. त्याकडे आतां माझं लक्ष गेलं.

"तुम्हीं काल तिच्या रांगोळीचं कौतुक केलंत तेव्हां तिला आकाश ठेंगणं झालं. काल घरीं एकसारखं तेंच सांगत होती. तुमच्याबद्दल फार वाटतं तिला—"

गोपीनं आईवर डोळे रोखले. घरांत बोललेल्या गोष्टी काय इथें येऊन सांगायच्या ! भोळी म्हातारी. तिला कुठला एवढा विवेक ! 'चल आतां घरीं. पाऊस थांबला आहे,' असं म्हणून आईला उठवतांना तिच्या स्वरांत लज्जेचा एक सूक्ष्म कंप मला प्रतीत झाला. जातांना तिनं एकदांच मान वळवली; पण त्या ओझरत्या नजरेंत कांहींतरी निराळेपण होतं. कदाचित् तिच्या गुणांचं मी काल अजाणतां कौतुक केलं, त्याची ती कृतज्ञता असेल. कदाचित् तिनं आईच्या हातीं पुढे केलेलं उपायन मी स्वीकारलं याचा तो आनंद असेल. कदाचित्...पण आणखी दुसरं काय असणार !

होतं, दुसरंहि कांहींतरी होतं. जें तिला उच्चारतां येत नव्हतं अन् मला मान्य करतां येत नव्हतं. पुढच्या चारआठ दिवसांतच मला तें कळून

आलं. विठोबावरची तिची भक्ति एकदम दुगुणी, चौगुणी झाली. देवळांतल्या तिच्या प्रदक्षिणा वाढल्या. प्रथम कांहीं दिवस तिनं आईला पुढें करून मला कधीं दही, कधीं दूध, कधीं चिरून भाजी असे पदार्थ पाठवले. पण पुढें मग ती स्वतःच तें काम करूं लागली. हळूच दार उघडायचं, दुधाचं भांडं आंत ठेवायचं अन् एक गाहिरा नयनबाण माझ्यावर सोडून मागच्या पावलीं पसार व्हायचं. तिचा हा चोरटेपणा मला संशयास्पद वाटूं लागला. अन् त्या प्रत्येक वेळीं आईचा तो अर्थगर्भ संदेश मला सावधानतेचा इशारा देऊं लागला. इकडे येतांना आईनं मला एकांतीं बजावलं होतं—

' पुराणिकाचा बायकांशीं विशेष संबंध येतो. जपून वाग. धुतल्या तांदुळासारखा निर्मळ रहा. नवखा आहेस, तरुण आहेस, देखणा आहेस, म्हणून बजावून ठेवत्यें. '

हळूहळू मला गोपीची चीड येऊं लागली. ' हा काय चावटपणा ! कोणी पाहिलं म्हणजे ? माझी काय शोभा होईल मग ? कोणतीहि पात्रता नसतांना केवढ्या मोठ्या फळाला वेंघू पहाते आहे ही ! काय अधिकार आहे हिला माझा वेध लावून घेण्याचा ? मीं त्या दिवशीं अजाणतां तिच्या रांगोळीचं कौतुक केलं त्याचा अर्थ तिनं काय असा घ्यावा ?...पुराण ऐकतांना सगळ्याच श्रोत्यांना वक्त्याकडे पहावं लागतं हें खरं; पण हिची तऱ्हा मुलखा-वेगळीच. ही माझ्यावरची दृष्टि कधीं बाजूला करीतच नाहीं. जणूं त्या सभामंडपांत तीच एक श्रोती आहे आणि एकाग्र श्रवण करून वक्त्याला प्रोत्साहन देण्याची जबाबदारी एकट्या तिच्यावरच येऊन पडली आहे ! केव्हांहि पहावं तर हिची आपली सोत्कंठ, भुकेलेली, तहानेलेली मुद्रा. माझ्या प्रत्येक वाक्याची प्रतिक्रिया तिच्या डोळ्यांत पाहून घ्यावी. '

माझं ' दुष्यंताख्यान ' सुरू होतं. त्याच्याशीं झालेली शकुंतलेची पहिली तोंडओळख, त्या प्रतिमदनाच्या दर्शनानं तिच्या हृदयांत उठलेले अनोळखी पण सुखावह असे भावतरंग, आतिथ्य करतांना तिला झालेला अनावर संभ्रम,

त्याच्या प्रश्नांना उत्तरं देतांना प्रणयसुलभ लज्जेनं तिची उडालेली तारांबळ, त्यानं गांधर्वविधीनं पाणिग्रहण करण्याची इच्छा प्रदर्शित करतांच, 'खरंच का एवढं सुख–सौभाग्य आपल्यापुढें वाढून आलं आहे,' या भावनेनं तिला झालेला सकंप हर्ष, हें सगळं माझ्या तोंडून ऐकतांना ती जणूं या जगांतलीच रहात नाहीं. तें जणूं मी तिचंच आख्यान लावलं आहे अशा संवेदनेनं ती चैत्रांतली मोगरी होते. कृष्णवर्ण मुखावर इतका अरुणराग पसरूं शकतो, एका सामान्य मुखमुद्रेवर कुठल्या तरी अज्ञात प्रांतांतलं सौंदर्य येऊन पुंजाळतं हें मला खरंच वाटेना.

भाद्रपदांत माझा भागवतसप्ताह सुरू झाला. सात दिवसांचा तो श्रोत्या–वक्त्यांचा वाग्यज्ञ होता. सकाळीं चार तास, दुपारीं चार तास एकासन घालून श्रोत्यांचीं अंगं आंबून जाणार होतीं. त्यांच्या पायांना विरविऱ्या येणार होत्या. माझंहि तसंच. मला आणखी वर आठ तास अखंड तोंड चालूं ठेवावं लागणार होतं. प्रत्येक दिवशीं ठराविक ग्रंथ वाचून आणि अर्थ सांगून संपवावाच लागणार होता. कसलीहि सबब चालण्याजोगी नव्हती. मी पहिल्या दिवशीं गणपतिपूजन करून केळीचे खुंट उभारलेल्या व्यासपीठावर विराजमान झालों. संहितेला प्रारंभ झाला. दोन तास मी अविश्रांत वाचन केलं आणि मग पंधरा मिनिटांचं 'मध्यंतर' घेतलं.

आणि त्याच क्षणीं गोपीनं आपल्या आईच्या हातीं गरम दुधाचं फुलपात्र माझ्यापुढं केलं. मी घसा शेकीत तें दूध घेऊं लागलों. गोपीचे डोळे उमलले. जणूं मंदिरांतला पांडुरंगच माझ्या रूपानं तिचा नैवेद्य घेत होता. पण त्याच क्षणीं बाकीच्या बायकांचे डोळे आकुंचले. एका गरीब सोनारणीनं आपल्या आधीं आघाडी मारावी अन् शास्त्रीबुवांनीं तिचा आदर करावा हें त्यांना मुळींच रुचलं नाहीं. आणखीहि एका गोटपाटल्यांच्या बाईनं केशरी दूध आणलं होतं; पण मी तें पिऊं शकलों नाहीं.

मात्र त्यानंतर इतर बायका शहाण्या झाल्या. दुसऱ्या दिवसापासून त्यांनीं

ठरवून आळीपाळीनं आपापलं दुधाचं भांडं माझ्या हातीं देण्याच्या कामीं त्वरा केली. ‘ कशी खोड मोडली या चोंबड्या बाईची, ’ हा कुद्दा भाव त्यांच्या त्या कृतींत मला स्पष्ट दिसत होता. पण गोपीची खरीच खोड मोडली होती का ?

मुळींच नाहीं. तिनं एक नवीच युक्ति शोधून काढली होती अन् ती ‘ चोरावर मोर ’ झाली होती. रात्रीं मी झोंपायच्या तयारीला लागतों, तर ती आईला पुढें घालून माझ्या खोलींत हजर अन् आईच्या हातांत दुधाचं भांडं.

“ कढत करून आणलं आहे. घ्या अन् गळ्याला शाल गुंडाळून झोंपा. सकाळीं आवाज चालला पाहिजे. ”

किती जिव्हाळा होता गोपीच्या या शब्दांत ! प्रथम प्रथम मला तिचा राग येई; पण अलीकडे तो येईनासा झाला होता. रागाची जागा अलीकडे अनुकंपेनं घेतली होती. एवढ्या–तेवढ्यानं त्या भग्नहृदयी ललनेचं समाधान होत असेल तर कशाला तिचा हिरमोड करावा, असं वाटूं लागलं होतं. त्या सप्ताहाचे माझ्यापेक्षां तिलाच अधिक कष्ट झाल्याचं दिसलं. समाप्तीच्या दिवशीं माझ्या गळ्यांत हार रुळले अन् नवी शाल अंगावर पडली, तेव्हां तर तिला अगदीं हर्षवायु होण्याची वेळ आली. जणूं हाच दिवस पहाण्या-साठीं तिनं आपला वैधव्याच्या आगींत होरपळलेला जीव जगवून, तगवून ठेवला होता. त्या रात्रीं दूध द्यायला आल्यावेळीं ती म्हणाली, ‘ देवानं पार घातलं एकदाचं ! ’ अन् तिच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलं.

आलेल्या शिधासामुग्रींतून मी सप्ताहाची सांगता करायचं ठरवलं. बारा ब्राह्मण जेवायला बोलावले. सप्ताहाच्या श्रोत्यांनाहि महाप्रसादासाठीं निमंत्रिलं. पाऊणशें—शंभर पान झालं. पण मला कांहींच करावं लागलं नाहीं. श्रोत्या बायकांनींच जबाबदारीनं सगळं पार पाडलं. माझं घरचं तिथं होतं कोण ?

पण नव्हतं असं तरी कसं म्हणूं ! गोपी होती ना. तिला स्वैंपाकांत

वावरतां येत नव्हतं; पण तिनं भाज्या चिरून देण्यापासून, आणलेलीं भांडीं-कुंडीं ज्याचीं त्याला परत करीपर्यंत सगळं निरीनिपटी उरकलं. इतर बायका आपसांत फुतफुतून तिचा उपहास करीत होत्या, हें माझ्या वेधक नजरेला दिसत होतं. तिलाहि तें दिसलं असेल. त्यांतला कुजका भावाहि कळला असेल. पण तिनं त्यांतलं काहीच अंगाला लावून घेतलं नाहीं. तिच्या उत्साहाला बहर आला होता. मी जणूं तिच्या घरचा होतों. तिचाच एकटीचा होतों.

सगळं निर्विघ्न पार पडल्याच्या समाधानांत मी त्या रात्रीं अंथरुणावर अंग टाकलं. म्हटलं, आज बिनघोर झोंप घ्यायची. पण लवकर डोळेच मिटे-नात. बळेंबळें मिटले तर त्यांनीं गोपीचीच मूर्ति पुढं उभी केली. तिचेच विचार सुरू झाले.

'गोपी कां बरं एवढा जिवाचा आटापिटा करते ? काय हवं आहे तिला ? कथाकादंबऱ्यांतून 'प्रेम, प्रेम' म्हणतात तें तर हें नव्हे ? असलं तर तें पुराणावरचं का पुराणिकावरचं ? मला हरघडी हरतऱ्हेनं उपयोगी पडून ही परमार्थ साधते का स्वार्थ पोसते ? चंद्राभोंवतीं खळं पडावं तसं हिनं माझ्या-भोंवतीं एक अदृश्य वलय निर्माण केलं आहे. हें वलय ती हळूहळू आवळीत आणते आहे. जिला मी पूर्वीं तुच्छ मानायचं ठरवलं, तीच आज मला तासन्तास आपला विचार करायला लावते आहे. आणखी दोन महिने माझ्या चातुर्मासाचे उरले आहेत. तेवढ्यांत ही कुठवर मजल गांठणार आहे? मला ही बऱ्या रीतीनं घरीं जाऊं देणार आहे का नाहीं ? बायकांच्या नजरा हल्लीं फार तीक्ष्ण झाल्या आहेत. त्यांना कसला तरी वेगळाच वास येऊं लागला आहे. त्या गोपीला उघड बोल लावतात, त्यांत माझीहि प्रच्छन्न निंदा असतेच, हें मला का समजत नाहीं ? छेः ! याला आतां पायबंद घातलाच पाहिजे.'

पण गोपीला कसं सांगायचं अन् कधीं सांगायचं या विवंचनेंत माझे आठ दिवस गेले. पहिल्यांदा वाटलं तितकं तें काम सोपं नव्हतं.

पण माझ्या विचारांना उच्चाराचं स्वरूप देण्याच्या आंत त्या गांवाचंच स्वरूप पालटलं. गांवांत एकाएकीं उंदीर पडूं लागले. कुठें कुठें प्लेगाची लागणहि सुरू झाली. चार दिवसांत कांहीं माणसं प्लेगाच्या भक्ष्यस्थानींहि पडलीं. पुराणाला जमणाऱ्या बायकांची आत्मस्तुति अन् परनिंदा एकदम खंडित झाली. आज कुठे उंदीर पडले अन्—अन् कोण लागलं याचीच चर्चा देवळांत गंभीरपणें सुरू झाली. भरल्या गांवावर, नांदत्या घरांवर चिंतेची काळी सावली पडली.

पहिलं महायुद्ध संपल्यानंतरचा तो काळ. सांथ सुरू झाली कीं आज-मितीस लगेच टोंचाटोंची सुरू होते. त्याकाळीं मोठ्या शहरांतूनसुद्धां टोंचण्याचं एवढं प्रस्थ नव्हतं; मग तालुक्यांतून किंवा खेड्यांतून कुठलं! प्लेग सुरू झाला कीं जीव घेऊन गांवाबाहेर पळायचं, मोकळ्या मैदानांत झोंपड्या घालून रहायचं, हाच त्या वेळचा लोकमान्य उपाय. आमच्या श्रोत्यांपैकीं श्रीमंत बायका होत्या त्या ताबडतोब झोंपड्यांवर गेल्या. माझ्या पुराणाचे अर्धे श्रोते कमी झाले. जे येत त्यांचीं तोंडं काळजीनं काळवंडलेलीं. श्रोते दुश्चित्त; त्यामुळें वक्ताहि दुश्चित्त. पुराणांतला रस एकदम आटला.

माझ्याहि पोटांत भयानं ठाण मांडलं. कांहीं सुचेना, कशांतच लक्ष लागेना. वाटलं, कीं पोथी गुंडाळून घरीं चालतं व्हावं. पण मी चातुर्मासाच्या लेखी करारानं बांधलेला होतों. मला पुराण मध्येंच बंद करणं शक्य नव्हतं. गांवांत तर हळूहळू लागण वाढत होती. पुढें काय करायचं हा मला पेंच पडला. देवाचा पुजारी मला म्हणाला.

"अजून आपल्या आळीला लागण नाहीं. तुम्ही निर्धास्त रहा. स्टेशना-जवळच्या माळावर दोन दिवसांत माझी झोंपडी उठते आहे. आमच्याबरोबर तुम्हीहि चला तिकडे. फक्त पुराणापुरतं गांवांत यायचं. बाकी सगळा दिवस तिथे."

पण भित्याच्या पाठीं ब्रह्मराक्षस न लागला तरच नवल! झोंपडींत

जाण्याच्या कल्पनेंत वावरत असतांनाच दुसऱ्या दिवशीं मला शहारून आलं. जांभया येतात, थंडी वाजते, ताप भरतो, म्हणतां म्हणतां काखेंत दुखूं लागलं. अशुभाची शंका आली अन् त्याच क्षणीं माझं :काळीज उघडं पडलं. दुपारीं नेहमींप्रमाणें फुटकळ श्रोते पुराणाला येतात तों मीं खोलींत कण्हत, उसासत पडलेला.

" काय हो शास्त्रीबुवा ! काय झालं ? बरं वाटत नाहीं का ? " काही म्हातारे श्रोते खोलींत येऊन मला विचारूं लागले. काहीं बायकाहि त्यांच्या मागून होत्या.

" ताप आला आहे. काखेंत गांठ आली आहे. " मीं कसंबसं सांगितलं. त्यासरशीं नित्य पुराण-श्रवण करणारे ते परमार्थी श्रोते एकदम चार हात मागें सरले. देवळाच्या मुख्य पंचांना बोलावणं गेलं. गांवांतल्या एकुलत्या डॉक्टराला ते बरोबर घेऊन आले. मला त्यानं कस तपासलं, काय केलं तें आतां स्मरत नाहीं. पण त्याचे ते दोन शब्द मात्र आठवतात—' प्लेगची केस ! '

आधीं मला शंका होतीच. आतां तिच्यावर डॉक्टरचं शिक्कामोर्तब झालं. माझ्या हातापायांतली उरलीसुरली शक्ति एकदम खलास झाली. त्याच क्षणीं मी अर्धमेला झालों. आतां मला वांचवणं देवळांतल्या त्या विटेवरच्या पांडुरंगाच्याच हातीं होतं.

पंचांच्यापुढें डोंगराएवढी समस्या उभी झाली. आतां या पुराणिकबुवाचं करायचं काय ? येत्या–जात्याचं देऊळ; तेव्हां तिथे ठेवणं शक्य नव्हतं. प्लेगाचं इस्पितळ म्हटलं तर तें जिल्ह्याच्या गांवीं तीस मैलांवर होतं. मग कोणाच्या घरीं ? कोणाच्या तरी झोंपडीवर ? पण हा चुडणीनं वाघ घरांत कोण घेणार ? कोणाचा जीव एवढा वर आला होता ! मग पुढें काय ?... पुढें काय ?...

पण जी समस्या साठी उलटलेल्या श्रोत्यांना अन् पंचांना एवढी बिकट

वाटली, ती एका सामान्य मुलीनं एकदम चुटकीसरशी सोडवली. आणि ती सामान्य मुलगी म्हणजे गोपी ! आईची ढाल करून ती पुढें आली. आईच्या तोंडून तिनें सांगवलं कीं, ‘ पुराणिकबुवांना आम्हीं आमच्या घरीं नेतों. ’

पंचांना अन् सगळ्यांनाच एकाएकीं हायसं वाटलं. ही ‘ पिडा ’ जर या बायांच्या घरीं ढकलली जात असेल तर देऊळहि मोकळं झालं अन् सगळीच कटकट मिटली. मग पुराणिक अन् त्याचं नशीब !

मी उठलों. उठणंच भाग होतं मला., माझ्या घशाला तहानेनं शोष पडला होता. चालतांना माझ्या लकण्या जाऊं लागल्या तर गोपीची आई मला हात देण्यासाठीं पुढे झाली. गोपी माझं अंथरूण गुंडाळून घेऊन पुढें पळाली. पंच आणि वृद्ध श्रोते दुरून का होईना, गोपीच्या घरापर्यंत पोंचवायला आले. त्यांनीं मला विचारलं, “ घरीं तार करायची का ? ”

मी हात जोडून त्यांना म्हटलं, “ तेवढं मात्र करूं नका. आमच्या कोंकणच्या खेडेगांवांत तार पोंचायला चार दिवस लागतील. अन् तार म्हटलं कीं तेवढ्यानंच आई प्राण टाकील. दोन दिवस माझा तालामाला बघा अन् मग काय तें करा. ”

मी आतां गोपीचा पाहुणा झालों. पण कशा विचित्र अवस्थेंत ! आतां मी देवाचा नव्हतों, देवळाचा नव्हतों, श्रोत्यांचा नव्हतों अन् आणखी कोणाचाच नव्हतों. फक्त एकट्या गोपीचा. तिनं ‘ निजा ’ म्हटलं निजावं, ‘ उठा ’ म्हटलं उठावं, ‘ औषध घ्या ’ म्हटलं घ्यावं, ती करील तें करून घ्यावं. केवळ तिच्या हातांतलं, जीव असून निर्जीव झालेलं बाहुलं. इतके दिवस आई पुढे अन् गोपी मागे असायची. आज ती पुढे अन् आई तिच्या मागे.

माझ्या अंगावर पांघरूण घालतांना, माझ्या दुखऱ्या कपाळाला सुंठ लावतांना मी तिच्याकडे पहात होतों. मी किती भयंकर रोगी होतों ! पण तिच्या त्या सांवळ्या पसरट मुखावर भयाचा लवलेशहि नव्हता. तिथे होती

ती माया ! होती ती तत्परता. तिला स्वतःच्या जिवाची जणूं जाणीवच नव्हती. तिला जणूं जीवच नव्हता, प्राणच नव्हता. ती ‘ आपुलें मरण ’ मरून बसली होती. आतां तिला मृत्यु कःपदार्थ होता.

सूर्य अस्ताला गेला, अंधार पडला, याची मला दखल नव्हती. मी माझ्याच तंद्रींत होतों. कण्हत होतों, तळमळत होतों. पण गोपीला काळाचं भान होतं. आतां रात्र पसरणार होती अन् कदाचित् ती काळरात्रहि ठरण्याचा संभव होता. बहुधा गोपी या रात्रीला भ्याली असावी. मी मधेंच मान फिरवून डाव्या हाताला पाहिलं. तिकडे गोपीचं देवघर होतं. तिथे दीपत्कार करून गोपी देवापुढे कपाळ घांशीत होती. ती देवाला अनेक नवस बोलली असेल. ‘ ही काळरात्र पार पडूं दे ’ म्हणून देवाला अष्टौभावें आळवून राहिली असेल. ‘ माझ्या ओंवाळलेल्या आयुष्याचा लचका तोड अन् तो जगाला हवा असलेल्या या प्राण्याच्या काळजांत घाल ’ म्हणून तिनं देवापुढे निर्वाण मांडलं असेल. मला त्याबद्दल मुळींच शंका नाहीं.

स्वतःच्या जिवावर उदार झालेल्या माणसांच्या दोन तऱ्हा आढळतात. पहिल्यांना दुसऱ्याच्याहि प्राणांची कदर उरत नाहीं. तीं कठोर, निर्दय, बेपर्वा होतात. अन् दुसरीं मेणाहून मऊ, सहृदय, सकरुण. गोपी दुसऱ्या जातीची होती. रात्री जेव्हां जेव्हां मी झांपडींतून डोळे उघडले, तेव्हां तेव्हां मला दोन वस्तु जाग्या दिसल्या. एक तो कंदील अन् दुसरी दोन पणत्या पाजळून घेतलेली ठाणदिवी म्हणजे ती गोपी. मी कण्हलों, विव्हळलों कीं माझ्या तोंडाजवळ तोंड आणून ती विचारी.

“ काय होतंय् ? काय हवंय् तुम्हांला ?... ”

ते शब्द पुटपुटते, हळुवार खरे; पण ते जणूं खोल कुठल्यातरी गाभाऱ्यांतून उमटत होते. ती गोपीची वाणी नव्हती. ती संतांची वाणी होती. सांत्वनाची आणि संजीवनाची. आजहि जेव्हां केव्हां मी आजारी पडतों, तेव्हां माझे कान गोपीचे ते शब्द कुठून तरी ऐकूं येतील काय म्हणून आसावतात. मी माझ्या

पत्नीला सांगतों, निशंःक मनान सांगतों, कीं तुला आणखी कांहीं करतां आलं नाहीं तर निदान गोपीचे ते शब्द चोरून आण.

ती रात्र अंधाराला काखोटीस मारून पसार झाली; पण तिनं माझे प्राण जाग्यावर ठेवले. सकाळीं डॉक्टरनं येऊन मला पुनः तपासलं. 'बरे होतील ना हो ?' या गोपीच्या आर्त प्रश्नाला त्यानं नुसतं स्मित केलं. त्याचा अर्थ गोपीनं काय हवा तो घ्यावा. दुपारीं शेजारच्या एका बाईनं पातेलीभर कण्हेरी आणून माझ्या उशाशीं आदळली अन् ती निघून गेली. गोपीनं ताटली-चमचा आणून पातेलीजवळ ठेवला. ती जरा दूर बसली अन् मला म्हणाली.

"उठतां ना ? कण्हेरी निवून जाईल."

मला त्या कण्हेरीचा, ती आणून आदळणाऱ्या बाईचा अन् ती खाण्या-बद्दल आग्रह चालवणाऱ्या गोपीचाहि संताप आला. कण्हेरी निवून तिच्यावर साय धरली तरी माझा राग निवला नाहीं. मी डोळे मिटून निपचित पडून राहिलों. तास–अर्धा तास निघून गेला. गोपीचीं आर्जवं पालथ्या घड्यावर पाणी झालीं. साहजिकच तिचे डोळे डबडबले.

गोपी मला पांघरूण घालूं शकत होती, कपाळाला सुंठ लावूं शकत होती, औषधाचा भाग माझ्या घशांत ओतूं शकत होती; पण तिचा उपाय चालत नव्हता तो अन्नाशीं. ती सोनारीण होती; मी ब्राह्मण होतों. नुसता आड-नांवाचा नव्हे, तर शास्त्रीबुवा अन् वर स्नानसंध्याशील. ती मला अन्न कसं घालणार ! पण मी झालों तरी अन्नावांचून किती वेळ राहूं शकलों असतों ? तास–दीड तासांतच माझी तलखली झाली. मीं हळूच डोळे उघडून असाहाय्यपणें शेजारीं बसलेल्या गोपीला म्हटलं.

"गोपीऽऽ !"

"काऽऽयं ?"

"माझ्याच्यानं उठवत नाहीं. तूं भरव मला—"

"मी ! माझ्या हातचं चालेल तुम्हाला ?"

" तुझ्या हातचं चालायचं नाहीं, तर आणखी कुणाच्या हातचं चालेल ? "

" खरंच ? "

" अगदीं खरं. इथून खरं ! " मीं माझ्या काळजावर हात ठेवला.

गोपी उठून विद्युद्वेगानं घरांत धावली. अर्ध्या तासांत नवी, गरम कण्हेरी बनवून घेऊन आली. ती शेजारणीची गारढोण कण्हेरी मला पाजायला गोपी आपलं आंतडं कुठे विकून आली नव्हती. तिनं भरलेला चमचा माझ्या ओठांशीं आणला. मीं आज्ञाधारक मुलासारखं तोंड उघडलं.

आपल्या हातानं माझा अंतरात्मा तृप्त करतांना गोपीच्या मुखावर जो प्रकाश पसरला होता, तो शब्दातीत होता. तो कांहींतरी पृथ्वीमोलाचं गवसल्याचा आनंद होता. तो कृतार्थतेचा आनंद होता. तो पाहून माझ्या डोळ्यांतून गंगायमुना ओघळूं लागल्या. त्या पाहून तिचाहि आवेग द्रवरूप होऊन त्यांना भेटायला आला. केवढं सात्त्विक, प्रेमळ, हृदयांत ठसणारं दर्शन होतं तें ! एखादा कवि त्या प्रसंगीं तिथें प्रकटता तर ती कण्हेरी, तो त्रिनबांगड्यांचा सांवळा हात, ती माझी मुखवटी आणि दोघांच्याहि नेत्रां-तून स्रवणारा तो अमृताभिषेक, हें सगळं त्यानं काव्यांत अमर केलं असतं. तेवढ्याच एका कृतीनं तो कीर्तिवंत झाला असता.

" गोपी, तूं आज मला कोणाच्या जागीं आहेस सांगूं ! माझ्या आ—"

आणि चटकन् तिनं आपला तळवा माझ्या तोंडावर दाबला. ' आ 'च्या पुढचं अक्षर तिनं आंतल्या आंत दडपून टाकलं.

" असलं भलतंसलतं बोलूं नका. भागवताच्या पोथीची शपथ आहे तुम्हांला—"

तिचा हात बाजूला काढण्यासाठीं मीं तो माझ्या हातानं घट्ट धरला. किती गार अन् सुखस्पर्श होता तो ! गोपी त्या स्पर्शानं आपादमस्तक मोहरली. तिच्या डोळ्यांतल्या बाहुल्या एकदम उजळल्या. मी तापानं कढत

होतों. मला शीतलता हवी होती. डोळ्यांना, कपाळाला अन् हृदयाला. मी तिथें तिथें तिचा तो हात नेला अन् शेवटीं हृदयावर स्थिर केला. तिनं तो हात जणूं मला दान देऊन टाकला.

मी उताणा होतों तो तिच्या बाजूला कुशीवर वळलों.

" गोपी, मी या गांठीच्या तापांतून जगलों अन् आईला दिसलों तर ती तुझी माणकामोत्यांनीं ओटी भरील. "

" माझी ओटी—"

गोपीला उरीं बाण लागल्यासारखं झालं. तिनं आपली मान बाजूला वळवली. माझी चूक मला कळून आली. ओटी भरून घेण्याच्या भाग्याला गोपी केव्हांच आंचवली होती. पण मला त्या वेळीं तें भान राहिलं नाहीं. माझा ताप भलताच वाढला होता अन् वाणीची नि विवेकाची फारकत झाली होती.

" गोपी !...गोपी ! तूं रडतेस ? माझं चुकलं. तूं डोळे पूस. बघ माझ्याकडे अशी...सूऽऽऽ सूऽऽऽ ! तूं रागावलीस तर मी पोरका झालों. बघ, बघ, अजून तुला हुंदके येताहेत. तुझं ऊर कांपतं आहे. मी चालता होऊं का इथून ! रस्त्यावर जाऊन पडतों अन् तळमळून, वळवळून मरतों..."

मीं झटक्यासरशीं उठण्याचा प्रयत्न केला. तिनं तात्रडतोब पदर फिरवून डोळे कोरडे केले. माझे दोन्ही खांदे धरून ती मला परत आडवा करूं लागली.

" नको...नको ! मी तुझा अंत पाहिला. मला आतां इथून जाऊं दे. मी मरायला पडलों असलों तरी तुला ऐकायचा नाहीं. मी पुराणिक आहें. धर्म, भीम, अर्जुन, राम, रावण, सगळे माझ्या काळजांत आहेत. तुझा काय पाड त्यांच्यापुढें !...काळुंद्री अमावास्या कुठली ! भुरभुऱ्या केसांची. चपट्या तोंडाची. काय अधिकार आहे तुला माझ्यावर प्रेम करायचा ! कुठे इंद्राचा ऐरावत अन् कुठे...चल, सोड—"

" आई ! आई ! अग हे कसं करताहेत बघ ग ! "

मला नंतर कळलं कीं मी गोपीला काय हवं हवं तें बोललों. तिनं मला कसं शांत केलं असेल तें तिचं तिलाच माहीत ! मी तापाच्या भरांत केलेला का असेना; पण तिनं तो अपमान गिळला. कुठून एवढी तितिक्षा तिनं आणली ? गोपीची माझ्याविषयींची भावना शुद्ध नव्हती हें मी जाणतों. पण कोणत्या तोंडानं मी तिला दोष देऊं ! ती तरुण होती, वंचित होती, माणूस होती. पण ज्याला हृदय वाहिलं, त्याची सेवा करतांना, त्याला काळाच्या दाढेंतून ओढून काढतांना तिनं सती–साध्वींचा आदर्श पुढे ठेवला होता. तो त्याग डोळे दिपवणारा होता. ती सेवा निकराची होती. गोपी आगट्यांत जळत होती. ज्वाळा पिऊन पचवीत होती.

मी माझ्या नव्हे, माझ्या पूर्वजांच्या नव्हे, तर गोपीच्या पुण्याईनं यमाजी भास्कराची चिठ्ठी परतवूं शकलों. पूर्ण बरा झाल्यावर एक दिवस विश्रब्ध गोष्टी बोलत बसलों असतांना मोकळ्या मनानं मीं हें तिला सांगितलं. पण ती हें श्रेय स्वतःकडे घ्यायला तयार झाली नाहीं. तिचं म्हणणं याच्या अगदीं उलट होतं—

"तुम्ही पुराण सांगत होतां.मी तुमच्याकडे टक लावून बसत होतें.तुमच्या शेजारीं खांबाला टेकून ऐकायला बसणाऱ्या त्या गुंजीकरांच्या म्हातारीला तें बरं वाटलं नाहीं. ती उठली. सुरकुत्या लोंबणाऱ्या, थरथरत्या हातांनीं तिनं ताम्हनांतला बुक्का घेतला अन् चारी बोटांनीं तुमच्या कपाळभर फांसला. त्या वेळचे तिचे शब्द आठवतात का ? ती म्हणाली होती : 'हें साजरंगोजरं तोंड अन् अशी लाघवी वाणी. पाप्याची दृष्ट पडायला वेळ नको !' पण तिनं तसं केलं कीं माझी दृष्टि अधिकच जडत असे तुमच्यावर. चंद्र कलंकानं शोभतो तसे तुम्ही अधिकच खुलत असां. शेवटीं त्या म्हातारीचंच म्हणणं खरं झालं. माझी मेलीची दृष्ट लागली तुम्हाला अन् म्हणूनच तुम्ही आजारी पडलांत. माझी नजर तुमच्या जिवावर उठली. यापुढं मी तुमच्या पुराणाला यायची नाहीं."

" वेडी आहेस कीं काय ! अशा दृष्टी पडत्या तर जगांतल्या सगळ्या सुंदरतेला तडे गेले असते. लुकलुकतीं नक्षत्रं निखळून् पडलीं असतीं. गोपी, तूं पुराण बंद करूं नको. तुझ्यावांचून यापुढें माझं पुराण रंगायचं नाहीं. तेवढंच एक सात्त्विक सुख आहे तुझ्या वांट्याला, तें कां दूर ढकलतेस ? "

" शब्दांतलं सुख फसवं असतं. तें तृप्ति देत नाहीं; आग उठवतं. "

" त्या आगीवर विवेकाचं पाणी ओतावं. वैराग्याची धार धरावी. "

" सांगायला सोप्या आहेत या गोष्टी— "

" नाहीं गोपी, सांगायलासुद्धा सोप्या नाहींत. मन मारून त्या सांगाव्या लागतात अन् आत्मघात होऊं नये म्हणून आचराव्या लागतात. "

" माझा घात—घात तो आतां कोणता व्हायचा राहिला आहे ? काय माझ्या वांट्याला उरलं आहे ? तुमच्या त्या शकुंतला, शर्मिष्ठा, मत्स्यगंधा रात्रीच्या अंधारांत येऊन मला घेरतात. माझा उपहास करतात. मला फिदीफिदी हंसतात. ' आम्ही आमचं मनोगत साधून घेतलं; पण तुला बावळटेला कसं जमणार तें ' म्हणून मला हिणवतात. जीव जात नाहीं म्हणून मी जगतें. वाटतं कीं, असं कुजत मरण्यापेक्षां एखाद्या झळाळत्या दिव्यावर झडप घालावी अन् पंख होरपळत मरून पडावं. "

" यालाच मी आत्मघात म्हणतों. "

" हुंः ! कुठें आहे तो आत्मा ! कुणी पाहिला आहे ? कुणाला गवसला आहे ! "

" तुझा आत्मा मला दिसला आहे गोपी. माझ्यासाठीं जिवावर तुळशीपत्र ठेवतांना, तहानभूक विसरून तूं माझी सेवा करतांना, मला त्याचा साक्षात्कार घडला आहे. थोडी अंतर्मुख होशील तर—"

पण गोपी अंतर्मुख होण्याऐवजीं तिर्यङ्मुख झाली आणि आंतला प्रक्षोभ जिरवण्यासाठीं तिथून उठून आंत चालती झाली. मीहि मग उठलों अन् देवस्थानच्या पंचांकडे निघालों. मला दुसऱ्या दिवसापासून पुराण सुरू करा-

यचं होतं अन् बिऱ्हाड पूर्ववत् देवळांत न्यायचं होतं. मी आलेला पाहून पंचांनीं पुजाऱ्याला बोलावून आणलं. पुजारीबुवा मला म्हणाले.

" पुराण चालू करायचं ना ? ठीक आहे. सकाळीं प्रायश्चित्त घ्या अन् दुपारीं ' श्रीगणेशाय नमः ' म्हणा. "

मी एकदम चकित झालों. प्रायश्चित्ताची ही काय भानगड तें मला कळेना. माझी प्रश्नमुद्रा पाहून भटजींनीं खुलासा केला.

" तें असं आहे, तुम्ही त्या सोनारणीकडे राहिलांत. तिच्या हातचं खावं प्यावंहि लागलं असेल. तुम्हाला कांहीं सांगायला नको म्हणा ! पंचगव्य घेतलंत, जानवं बदललंत, कीं—"

मला संताप आला. त्या पंचांचा अन् त्या भटजींचाहि, रागाचा उमाळा कसाबसा गिळून मी म्हणालों.

" या गोष्टीला मी जबाबदार नाहीं. तुम्ही जर मला आपल्या घरीं नेलं असतंत तर माझ्यावर हा प्रसंग आलाच नसता. "

" तें जाऊं द्या हो ! "

" जाऊं द्या कसं ? एवढी तुम्हाला धर्मकर्माची कदर असती तर मला एखाद्या शुचिर्भूत ब्राह्मणाच्या घरीं कां नाहीं नेऊन टाकलंत ? तें शक्य नव्हतं तर मग रस्त्यावर तरी टाकायचं होतंत !..."

" असे चवताळूं नका शास्त्रीबुवा ! आम्ही तुम्हाला खर्चांत घालीत नाहीं. आपद्धर्म आम्हांलाहि कळतो. फक्त पंचगव्य. केवळ जातिबाह्य व्यवहारासाठीं. "

" बस् करा ! पुढें बोलूं नका. मी प्रायश्चित्त घेतलं आहे. आजवर जाणूननेणून कांहीं अशुद्ध, अपवित्र पोटांत गेलं असेल तर गोपीच्या हातचं पुण्यपावन अन्न सेवून मी आज शुद्ध झालों आहें. काय समजलं ? "

" हें तुमचं प्रायश्चित्त मुलखावेगळं दिसतं. ! हें आम्हाला चालायचं

नाहीं. आमच्या देवाला त्याहून चालायचं नाहीं. तुम्हाला अशा स्थितींत देवळांत पुराण सांगतां येणार नाहीं. "

" ठीक आहे. मला तुमच्या पवित्र पुराणाची गरज नाहीं. माझा मार्ग मोकळा झाला असं मी समजतों. "

मी तिथून त्वेषानं उठलों अन् चालता झालों. या कृत्यानं मी पुराणावरच पाणी सोडलं नव्हतं; तर प्राप्तीवर आणि कीर्तीवरसुद्धा. रिकाम्या हातानं आलों अन् रिकाम्या हातानंच मला परत जावं लागणार होतं. पण ती माझी हानि कधींतरी अन् कुठेतरी भरून निघाली असती. पण प्रायश्चित्त घेऊन मी जर गोपीचा अपमान केला असता तर ती माझ्या माणुसकीची हानि ठरणार होती अन् ती मात्र कधींच भरून निघाली नसती. पोथींतल्यापेक्षां निराळा एक आलिखित धर्म आहे हें मला गोपीनंच शिकवलं होतं. नुसत्या उक्तीनं नव्हे; तर कृतीनं !

घरीं येऊन जेव्हां मीं गोपीला हें सगळं सांगितलं, तेव्हां तिची अवस्था विलक्षण झाली. तिला हर्ष झाला आहे का शोक झाला आहे हेंच मला प्रथम कळेना. क्षणभर तिचं तें सांवळं मुख कसल्या तरी दैवी समाधानानं उजळलं. तिचीं नेत्रदळं पुरतीं उमललीं. तिनं मला थोडा वेळ डोळ्यांवाटे जणूं पिऊन घेतलं. आणि मग एकाएकीं तिची भरती ओसरली. ती दीन, उदास बनली. बराच वेळ ती निःशब्द राहिलेली पाहून मी तिचीं काकुळती केली.

" गोपी, बोल ना ! आजचाच दिवस बोल. आजचीच रात्र बोल. उद्या मी या गांवाला रामराम ठोकणार आहें. "

" काय बोलूं ! केवढ्या पदवीवर तुम्ही मला नेवून बसवलीत ! किती उंच चढवलीत ! माझ्या हातच्या अन्नानं तुम्ही पुनीत झालांत ? माझ्याकडे हें म्हटलं असतंत तर तुम्ही तोंडदेखलं बोलतां असं मी समजलें असतें. पण तुम्ही तें पंचांना, पुजाऱ्याला बोललांत, जाहीरपणें बोललांत. हें बक्षीस

मला दोन्ही हातांनीं पेलत नाहीं. स्वतःला नाडून घेऊन तुम्ही तें मला दिलंत. तुमची प्राप्ति, तुमची कीर्ति, सगळं बुडवलंत अन् मला तारलीत. मघाशीं तुम्ही म्हणालांत त्या आत्म्याचा लहानसा किरण आतां माझ्या हृदयांत शिरला आहे. तो कांहीं तरी निराळी प्रचीति दाखवतो आहे. त्याच्या उबेंत जगतां येतं का पाहीन. त्याच्या प्रकाशांत पुढचा रस्ता चोखाळतां येतो का बघीन..."

बोलतां बोलतां पुन्हा गोपीचा कंठ दाटला. ती पदरांत तोंड लपवून स्फुंदूं लागली. अजून महिना दीड महिना मी डोळ्यांपुढे राहूं शकेन ही तिची आशा अकस्मात् भंगली होती. मी आतां फक्त एका दिवसाचा सोबती होतों. मी जाणं म्हणजे तिच्या वांट्याला प्राण निघून जाण्यासारखं होतं. मलाहि त्या गोष्टीचं परम दुःख झालं. पुराणाचा त्याग करणं माझ्या हातांत होतं. पण गोपीच्या दुःखाचा परिहार माझ्या हातांतला नव्हता. त्यासाठीं तो विटेवरचा करुणाघनच तिच्यावर वोळायला हवा होता !

---

# अज्ञात हितचिंतक ६

--१--

मुंबई

ता. ९-२-४९

ती. वडिलांचे सेवेसीं—

कृ. सा. न. वि. वि.

तुमचें पत्र मिळालें. ती. सौ. आईनें पुनश्च आंथरूण धरलें हें वाचून काळजीला एक नवें साधन मिळालें. जरा हातपाय हालवतां येऊं लागले कीं ती घरांत वावरायला लागते. चुलीचा मोह तिला सुटत नाहीं. कित्येकदां विनवलें तरी तिचें आपलें व्रत कायमच. वस्तुतः हातून होत नाहीं तर तिला एवढी धडपड करायचें कारण नाहीं. कर्ती सवरती सुनंदा तिच्या हाताशीं नाहीं का ? बरें, ती जर अंगचुकार असती, आळसाला पुजीत बसणारी असती तर गोष्ट अलाहिदा. आमच्या ताईसाहेब तशा फार चांगल्या आहेत.

पण माझी आतां खात्री झाली आहे कीं, सुनंदा घरांत आहे म्हणूनच आई आतांशा वारंवार आजारी पडते. तिला सुनंदेच्या लग्नाशिवाय हल्लीं दुसरें कांहीं सुचत नाहीं. तिच्या मैत्रिणी एकामागून एक संसाराला लागल्या, त्यांतल्या कांहीं लेकुरवाळयाहि झाल्या अन् आपली सुनंदा अजून तशीच राहिली आहे, हा एकच घोर तिनें मनाला लावून घेतला आहे. डॉक्टर सांगतात कीं ' संधिवाताचें दुखणें हें पुष्कळदां मानासिक कारणांतून उद्भवतें.'

'चिंतासमं नास्ति शरीरशोषणम्' हें केवळ सुभाषितच नव्हे; तर सत्यभाषित आहे असें आतां अनुभवानें म्हणायला हरकत नाहीं. पण ज्या गोष्टी हातच्या नाहींत त्यांच्याबद्दल चिंता करून काय होणार आहे ? आपण प्रयत्न करतों त्याला कधीं तरी अन् कुठें तरी यश येईलच. मनाजोगतें स्थळ मिळवायचें तर कांहीं दिवस वाट पहावी लागणारच. सुनंदेला म्हणावें कीं आतां तुळशी-पुढें बसून रुक्मिणीस्वयंवराचीं पारायणें सुरूं कर. म्हणजे तरी एखादा नवरदेव चटकन् पुढें उभा रहातो का पाहूं. जुन्या काळच्या मुली तसें करीत असत असें आईच मागें एकदां म्हणाली होती.

तसेंच आईलाहि सांगा कीं सुनंदेची एक काळजी करतेस तेवढी पुरे. माझी आणखी नको करूं. केशवाश्रमांत जेवण चांगलें असतें. आईच्या गोड घासाची त्याला सर नाहीं हें खरें; पण तें माझ्या प्रकृतीला मानवलें आहे. गोडबोल्यांच्या स्थळाबद्दल तुम्हीं खडा टाकला होता, त्याचें काय झालें तें पुढील पत्रीं कळवावें. कळावें हे विज्ञापना.

तुमचा

चंद्रनाथ

—२—

पुणें

ता. १५-२-४९

अनेक आशीर्वाद.

तुझें पत्र तुझ्या आईला वाचून दाखवलें. ऐकतांना तिनें डोळ्यांतून पाणी काढलें. अगदीं हळवी झाली आहे ती आतांशा. तिची चिंता दुधारी आहे. तिला सुनंदेला तर घरांतून पिटाळायची आहेच; आणि शिवाय तिच्यासारखीच दुसरी एक 'गुणवंती' वाजतगाजत घरांत आणायची आहे. तुझे चार हात झालेले पाहिल्याशिवाय आपलें कांहीं बरेंवाईट होऊं

नये अशी तिची देवाजवळ प्रार्थना असते. तुझ्या लग्नाचा विषय निघाला कीं तिची कोमेजलेली मुद्रा लगेच टवटवीत होते. असे कांहीं बेत रचून ती सांगूं लागते कीं कोणाला वाटावें, चारच दिवसांवर तुझ्या लग्नाचा मुहूर्त आला आहे. मीसुद्धा घटकाभर त्या मनोरथांत रंगून जातों. पण अडचण आहे ती ही कीं, मुलीला संसाराला लावल्याशिवाय मुलाचा संसार कसा मांडून द्यायचा ?

गोडबोल्यांचें स्थळ हातचें गेलें म्हणायला हरकत नाहीं. सुनंदा त्यांना पसंत आहे; पण हुंड्याच्या बाबतींत आम्हीं त्यांच्या घासाला पुरे पडण्यासारखे नाहीं. म्हणजे हा होकार नकारांतच जमा. अशी एकेकाची दुसऱ्याला नाडून घेण्याची वृत्ति पाहिली कीं मनांत त्वेष भरतो. मध्यम वर्गाची सर्वच बाबतींत कुचंबणा चालली आहे तिथें लग्न हें तरी त्याला अपवाद कसें असणार ! गोडबोल्यांसारख्या ‘ उच्चवर्गीय ’ माणसांकडे आम्ही गेलों हीच मुळांत चूक. आपल्या दाढेखालीं मांस किती आहे त्याचा अंदाज घेऊनच आम्हीं त्या दिशेला पाऊल टाकायला हवें होतें. मुलगी शिकली म्हणजे तिच्या लग्नाचा प्रश्न सुलभतेनें सुटतो हा माझा भ्रम आतां पुरता फिटला आहे. उलट मला आतां असें वाटतें कीं, सुनंदा जर बी. ए. झालेली नसती तर एखाद्या कमी शिकलेल्या पण होतकरू मुलाशीं तिचें सहज जमवतां आलें असतें. पण आज ती परिस्थिति उरली नाहीं. सुनंदेला पटायचें नाहीं हें तर झालेंच; पण शिवाय आम्ही तरी कुठें तयार आहोंत त्या गोष्टीला ? म्हणजे स्वार्थी वृत्तीचा विटाळ आमच्याहि अंगाला लागतोच. आम्हीहि खालीं न पहातां वरच पहातों.

हल्लीं हिच्या शुश्रूषेंत मला बराच वेळ घालवावा लागतो. त्यामुळें मठांतलीं गीताप्रवचनें अंतरतात. पण दुधाची तहान ताकावर म्हणतात, तसें घरींच काहीतरी मी वाचतों. त्यामुळें तिचाहि वेळ बरा जातो. ‘ एक पंथ दो काज ! ’ बाकी विशेष कळवण्यासारखें कांहीं नाहीं. पण नाहीं कसें ?

हिनें तुला रोज दूध घ्यायला बजावलें आहे. तिला वाटतें, आपला 'बाबा' नोकरीला लागला आहे म्हणजे कामाच्या घाण्यालाच जुंपला आहे. क. आ.

तुझा
अण्णा

— २ —

मुंबई
ता. १७-२-४९

ती. वडिलांचे सेवेसीं—
कृ. सा. न. वि. वि.

मुलांच्या कौतुकांत आणि त्यांच्या बऱ्याभल्याच्या चिंतवणींत आईबाप कसे रंगतात आणि आपल्या आधिव्याधि क्षणभर कशा विसरतात तें कालच्या तुमच्या पत्रावरून समजलें. त्यावरून मलाहि कांहीं विचार सुचतात. पण आजच्या पत्रांतली सगळी जागा एका महत्त्वाच्या विषयासाठीं राखून ठेवली पाहिजे.

चार दिवसांपूर्वीं आमच्या केशवाश्रमांत एक तरुण गृहस्थ येऊन उतरले आहेत. आश्रमाच्या नोंदबुकांत त्यांनीं आपला पत्ता नोंदवला आहे तो असा—

"जयवंत सदाशिव सिधये
गांधीनगर
बंगलोर सिटी"

ते ज्या पद्धतीचें मराठी बोलतात तें ऐकून कोणी न सांगतांच कळतें कीं स्वारी दाक्षिणात्य असली पाहिजे. ते आल्यापासून आश्रमांतल्या त्या खोलींतली रहदारी वाढली आहे. नाना पेशांचे नाना लोक त्यांना भेटायला येतात. गृहस्थाच्या ओळखी जबरदस्त दिसतात. बोलणें कसें साखरेंत घोळल्यासारखें. व्यापारी पेशाला एकदम लायक. जेवायलासुद्धां

एकटे बसायचे नाहींत. कोणी तरी आयत्या वेळीं धरून आणलेले एक दोन 'गेस्ट' असायचेच. आश्रमांतलीं गडीमाणसें त्यांच्या कसल्याहि कामाला एका पायावर तयार असतात. 'दानेन भूतानि वशीभवन्ति' दुसरें काय ! मालकानें त्यांना 'सरदार' बनवलें आहे. बोलतांना अधून मधून खांदे उडवायची संवय आहे त्यांना. एखादी कोटी करतील, इतरांच्या आधीं आपणच खदखदां हंसतील अन् 'द्या टाळी' या अभिनिवेशानें जवळच्या माणसापुढें हात उताणा करतील. कां कोण जाणे; पण त्यांच्याबद्दलचें माझें कुतूहल वाढत्या प्रमाणावर आहे. दोन तीन वेळां त्यांचा आमचा पंगतीचा योग जुळला. बोलतां बोलतां ओळखहि झाली. प्रभावी व्यक्तिमत्त्व देवानें त्यांना दिलें आहे हें मला पदोपदीं जाणवतें. रुंद चेहऱ्याचा अन् पाणीदार डोळ्यांचा हा नवयुवक ज्याच्या पाठीशीं उभा असेल त्यानें कोणाचीहि डर बाळगूं नये असें माझी मनोदेवता मला सांगते. बंगलोरला त्यांची एक 'सिल्क फॅक्टरी' आहे अन् तिच्यासाठीं कांहीं नवी यंत्रसामुग्री खरीदायला ते इथें आल्याचें मला त्यांच्या खोलींत चालणाऱ्या संभाषणावरून समजलें.

हें सगळें समजलें तरी विशेष परिचयाविना न समजणारी एक गोष्ट अचानक काल कळली. कचेरींतून सुटल्यावर बिऱ्हाडीं येत असतांना लॅमिंग्टन रस्त्यावर आम्ही दोघे समोरासमोर आलों. उभयपक्षीं नमस्कार झाल्यावर त्यांनीं माझ्या खांद्यावर हात टाकला.

"चला, इंडिया कॉफी हाउसमध्यें जाऊं. आमच्या मद्रासी कॉफीची कडवट चव चाखायला लावतों तुम्हांला."

दोघांनाहि वेळ मुबलक होता. अत्यंत मोकळ्या मनानें ते माझ्याशीं बोलले. व्यावसायिक क्षेत्रांतले अनेक अनुभव सांगून त्यांनीं माझ्यापुढें एक निराळेंच जग उभें केलें. मधून मधून आपल्या आईच्याहि कांहीं गोष्टी सांगितल्या. आईवर बरीच भक्ति दिसते स्वारीची. आणि या घरगुती संभाषणांत एक गोष्ट उघड झाली ती ही कीं, ते अजून

' चतुर्भुज ' झालेले नाहींत. ते धंद्यासाठीं जसे मुंबईस आले आहेत तसेच वधूसंशोधनासाठींहि. अजून त्यांचें कुठें जमलेलें नाहीं. तेव्हां तुम्हांला विचारायचें तें हें कीं मी सुनंदेबद्दल त्यांच्याकडे शब्द टाकूं का ? तुम्ही म्हणाल, ' इतकें चांगलें स्थळ असलें तर वेड्या, शब्द टाकूं का म्हणून काय विचारतोस ? शक्य तेवढी खटपट कर. '

पण अण्णा ! हें स्थळ चांगलें असलें तरी सर्वांगसुंदर नाहीं. विधाता एका ठिकाणीं घसरला आहे. त्यांचा एक पाय अधू आहे. म्हणजे कुबडी नाहीं घ्यावी लागत. त्या पायाचा थोडाबहुत उपयोगहि होतो. पण व्यंग तें व्यंगच. आपली सुनंदा कशी नक्षत्रासारखी आणि सर्वांगीं नेटकी आहे. तिला हें स्थळ पसंत पडेल का नाहीं याचा विचार करण्यापूर्वीं तिच्यासाठीं आपण तरी असला मुलगा तिच्यापुढें आणावा कीं नाहीं हें आपण आधीं ठरवलें पाहिजे. सुनंदा त्यांना पसंत पडेल याची मला खात्री वाटते. पण...दुधाचा घोट गिळवतहि नाहीं अन् टाकवतहि नाहीं अशी माझी अवस्था झाली आहे. तुमचें पत्र येईल त्याप्रमाणें पुढचें पाऊल टाकीन. कळावें, हे विज्ञापना.

तुमचा

चंद्रनाथ

—४—

मुंबई

ता. २६–२–४९

ती. आईस शिरसाष्टांग नमस्कार. वि. वि.

डोळ्यांत तेल घालून माझी वाट पहात बसली असशील ना ? माझा मुक्काम लांबला हें खरें; पण त्याला उपाय नाहीं. अग, ही मुंबई आहे. ज्यांना भेटायचें, ज्यांच्याशीं व्यवहार करायचा, ते लोक कुलाब्यापासून अंधेरीपर्यंत विखुरलेले आहेत. एकदोघांच्या भेटी होतात तों दिवस संपून जातो.

पुष्कळदां हवा तो माणूस; भेटतंहि नाहीं. मग टेलिफोनचे नंबर फिरवीत सुटायचें आणि भाड्याच्या गाड्या पळवायच्या. व्यावसायिक कामें आतां आटपत आलीं आहेत; पण तूं सांगितलेली कामगिरी अजून पार पाडायची आहे. ती न करतां तसाच उठून आलों तर तूं मला घरांत घेशील कीं नाहीं याची धास्ती वाटते. कांहीं झालें तरी तुझ्यापुढें सून आणून उभी केल्यावांचून आतां मला सुटका नाहीं.

ज्यांनीं आमच्याशीं पत्रव्यवहार केला होता त्या सोमणांच्याकडे काल दुपारीं गेलों होतों. नृत्याचे पदक्षेप टाकीत, लांब लांब कर्णफुलें हालवीत दारावरचा पडदा बाजूला करून ती सोमणकन्यका बाहेर आली आणि झुकता नमस्कार करून माझ्या समोरच्या खुर्चीवर बसली. मला संभ्रम पडला कीं, मी वधू पहायला आलों आहें का सिनेमानटी? बापानें ओळख करून दिली. 'हे जयवंतराव सिधये.' मी तिला एकच प्रश्न विचारला.

"तुम्हांला कोणी शंभरांची नोट दिली तर तुम्ही तिचं काय कराल?"

तिचा बाप एकदम चमकला. त्याची रोखलेली दृष्टि मला म्हणत होती. 'हा काय वेड्यासारखा प्रश्न? शिक्षण विचारा, कला विचारा, छंद विचारा—' पण मुलीला तसें मुळींच वाटलें नाहीं. तिनें ताबडतोब उत्तर दिलें. तिचेच शब्द ऐक हं आई.

"अय्या! एकदम शंभर रुपये! मी धांवत पळत गिरगांवांत जाईन अन् दोन झक्कपैकीं चंदेरी साड्या घेईन. एक सुंदर मनीपर्स अन् एवढं घेऊन पैसे उरले तर चॉकोलेटचा डबा."

आई, असली सून तुला परवडेल का? जी हातीं आलेला पैसा खर्च करतांना यत्किंचितहि विचार करीत नाहीं आणि जी केवळ स्वतःपुरतेंच पहाते? शितावरून भाताची परीक्षा कर तूं. ही मुलगी यंदा बी. ए. ला बसणार आहे बरं का. अन् तीसुद्धा इतिहासाबरोबर अर्थशास्त्र घेऊन. मी तिच्याकडून उत्तर अपेक्षित होतों तें हें.

"मी ते पैसे, खर्च करण्याचें योग्य कारण दिसेपर्यंत तसेच संभाळून ठेवीन किंवा वडिलांच्या हातीं देऊन मोकळी होईन."

तिचा बाप मोठा वस्ताद दिसला. जांवयाच्या हौसा-मौजा पुऱ्या करायला आपण वित्तशाठ्य करणार नाहीं, हें त्यानें मोठ्या खुबीनें मला सुचवलें. त्याला वाटलें असेल, कांतेला पाहून नसलें तर निदान कनकाच्या आमिषानें तरी माझ्या तोंडाला पाणी सुटेल.

थोडक्यांत सांगायचें तर मुंबईला ज्या मुली मी पाहिल्या, त्यांतल्या एकीचीहि निवड करावीशी वाटत नाहीं. आतां पुण्यावरच्या स्वारींत काय निष्पन्न होतें तें पाहूं. येथें एक गृहस्थ नुकतेच माझ्या परिचयाचे झाले आहेत. त्यांनीं आपल्या बहिणीबद्दल मजकडे शब्द काढला आहे. त्यासाठीं ते मला पुण्यास आपल्या घरीं घेऊन जाणार आहेत. पुणें आपल्या वाटेवरच आहे; तेव्हां म्हटलें, त्यांना तरी नाराज कां करा !

आल्यावर सर्व वृत्तांत मातृचरणीं सादर करीनच. हे विज्ञापना.

तुझा

जयवंत

— ५ —

पुणें

ता. १–३–४९

प्रिय दादा,

तूं शनिवारीं जयवंतांना घेऊन आलास आणि रविवारीं रात्रीं निघून गेलास. जयवंत लगेच पुढें जायचे; पण आईच्या आग्रहासाठीं–माझ्या नव्हे हं!–एक दिवस थांबले. दोन दिवस घर कसें भरून गेलें होतें. आनंदाचा लोंढा आला होता. पण औराचें पाणी तें! आलें तसें ओसरलें. वस्तुतः तुम्ही दोघे दोन दिशांना निघून गेल्यानंतर घरांतलें वातावरण उदास बनायचें. पण या खेपेस तसें झालें नाहीं. आई कसल्या तरी सुखस्वप्नांत

मग्न आहे. अण्णांच्या मुद्रेवर उत्साहाच्या रेषा उमटल्या आहेत. अन् मी ? दादा, तूं माझी चेष्टा करशील हें मला ठाऊक आहे; पण तरीहि लिहायला हात आवरत नाहीं. माझ्याभोंवतींहि एक कोवळ्या प्रकाशाचें सप्तरंगी वलय उल्हसत आहे असा मला भास होतो. आशेची जादू कांहीं विलक्षण असते, नाहीं ? त्यांनीं अजून स्पष्ट कांहीं सांगितलें नाहीं. आपल्या आईच्या संमतीनें ते आपला निर्णय कळवणार आहेत. माझा एक फोटो बरोबर नेला आहे त्यांनीं. आतां पोस्टमनच्या वाटेकडे डोळे लावायचे. पण हें सगळें आशादायक असलें तरी एक विचार हृदयांतून दूर होत नाहीं दादा ! त्यांना तें शारीरिक व्यंग नसतें तर ! त्यांचा तो डावा पाय त्यांना किती ओढीत न्यावा लागतो ! प्रत्येक पदक्षेपाला ते डाव्या बाजूला झुकले जातात. सुटाबुटांत खुर्चीवर बसले कीं, त्यांचा रुबाब पाहून घ्यावा. तूं मागच्या पत्रांत लिहिलें आहेस तें मात्र सोळा आणे खरें. ‘ हा नवयुवक ज्याच्या पाठीशीं उभा असेल त्यानें कोणाचीहि डर बाळगूं नये. ’ अगदीं हीच भावना त्यांच्या सान्निध्यांत वावरतांना मला जाणवत होती.

ते श्रीमंत आहेत हें कोणी तरी सांगावें लागतें. त्यांच्या चालण्या-बोलण्याला श्रीमंतीचा भपकारा एकदाहि आला नाहीं. घरीं आल्यावर एका क्षणांत त्यांची अनोळखी फिटली. अगदीं घरच्यासारखे वागले ते आपल्याकडे. जणूं त्यांचें आपलें पिढ्यान्‌पिढ्यांचें नातें आहे. मुंबईलामुद्धा असेच वागत होते का रे ? आई तर त्यांच्या विरुद्ध ‘ ब्र ’ काढूं देत नाहीं. तिच्या आजाराची त्यांनीं आस्थेवाईकपणें चौकशी केली. तिला बंगलोरला हवापालट करण्यासाठीं बोलावलें आणि तिनें केलेल्या पदार्थांची रुचि घेऊन ते जेवले. आणखी काय हवें तिला ?

अण्णा ‘ ज्ञानेश्वरी ’ काढून बसले असतांना त्यांनीं जेव्हां तिच्यावर चर्चा सुरू केली तेव्हां मात्र मला हसूं आवरेना. मी चटकन् उठून घरांत पळालें. त्यांना ज्ञानेश्वरींतलें ‘ ओ ला टो ’ मुद्धां कळत नाहीं दादा. कुठें तरी

त्यांनीं एक ओवी ऐकली आहे. ‘ माझा मराठाचि बोल कौतुकें–’ बस्स ! पण अण्णा काय म्हणतात ठाऊक आहे ? ‘ मुलगा मोठा जिज्ञासु दिसतो. ’

तात्पर्य, घरांतलें वातावरण अगदीं भारून गेलें आहे. तूं सुद्धा त्यांचेच पोवाडे गात सुटला आहेस. तेव्हां मला आतां काहीच बोलायची सोय उरली नाहीं. ‘ तुका म्हणे उगी रहावें, जें जें होईल तें तें पहावें. ’

क. लो. वि.

तुझी

सुनंदा

—६—

पुणें

ता. ५–३–४९

अनेक आशीर्वाद.

गोष्टी कशा गुंतागुंतीच्या घडतात पहा. आम्हीं जेव्हां गोडबोल्यांचा उंबरठा झिजवीत होतों, तेव्हां ते शिखरावर चढून बसले होते. आणि आम्हीं जेव्हां तो नाद सोडला तेव्हां ते आतां आमच्या मागें लागले आहेत. जयवंत बंगलोरला निघून गेले, त्यानंतर दुसऱ्याच दिवशीं त्यांच्यावतीनें एक वृद्ध गृहस्थ आमच्याकडे आले. बहुधा अंदाज काढायला असें वाटतें. बंगलोरला आमचें जमूं पहात आहे, अशी त्यांना कुणकुण लागली असावी. या कामीं आमच्या शेजारच्या भिंतीचेच कान लांब झाले असले पाहिजेत. दुसऱ्या खेपेला गोडबोले स्वतः उठून आले आणि त्यांनीं स्पष्टच सांगितलें कीं, ‘ आम्हांला हा संबंध जुळवायचा आहे. तुम्ही स्वखुषीनें द्याल तें आम्हीं समाधानानें स्वीकारूं. पैशांपेक्षां थळीकुळीलाच आम्हीं अधिक महत्त्व देतों. ’

चांगली मुलगी हातची जाते हें समजल्यावर त्यांना हा शहाणपणा सुचलेला दिसतो. हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागण्यापेक्षां त्यांच्या मागणीला रुकार द्यावा असें मला क्षणभर वाटलें. पण माझ्या या मताला घरांत

दुजोरा मिळाला नाहीं. सुनंदाहि गोडबोल्यांबद्दल फार तिखट बोलली. एक तें व्यंग सोडलें तर जयवंत इतर सर्व दृष्टींनीं चांगले आहेत हें मलासुद्धा पटतें. पण त्यांच्याकडून अनुकूल उत्तर येईलच हें कशावरून! 'दोन्ही खळीं चुकलीं' असा प्रसंग येऊं नये म्हणजे मिळवली. बाकी सर्व ठीक.

तुझा

अण्णा

—७—

बंगलोर

ता. ८–३–४९

प्रिय चंद्रनाथ,

तुमच्या घरीं दोन दिवस जो माझा स्वागत—सत्कार झाला तो मी कधींहि विसरणार नाहीं. विशेषतः माझ्यासाठीं तुमच्या प्रेमळ आईनें आणि बहिणीनें घेतलेले कष्ट! या ऋणाची परतफेड मला अंशतः जरी करतां आली तरी मी स्वतःला भाग्यवान् समजेन. पण निदान आज तरी तसा योग नाहीं. तुम्ही मजकडून जी अपेक्षा करतां ती पुरी करायला मी समर्थ नाहीं, हें कळवतांना मनाला होणाऱ्या वेदना मीच एकटा जाणूं शकतों. सत्याला सन्मुख होऊन मला हा निर्णय घ्यावा लागत आहे हें तुम्हीं समजून घ्या आणि माझा राग धरूं नका एवढेंच विनवणें. तुमच्या आई—वडिलांस माझे सादर प्रणाम कळवा. आणि तुमची बहीण! तिच्याबद्दल काय लिहूं, कसा आदर व्यक्तवूं तेंच मला कळत नाहीं. क्षमस्व!

तुमचा

जयवंत

—८—

पुणें
ता. १२–३–४२

सादर नमस्कार वि. वि.

मायन्याच्या जागीं एखादें सुंदर संबोधन ठळक अक्षरांत लिहून या पत्राला सुरुवात करतां येईल अशी अपेक्षा धरली होती. पण कालच्या दादाला आलेल्या तुमच्या पत्रानें तो मार्ग खुंटला अन् ती आशाहि तुटली. आठ दहा दिवसांपूर्वी तुम्ही आमच्याकडे आलांत. घरांत उत्साहाचें पर्व निर्माण केलेंत. सर्वांच्या नेत्रांना तुमचा छंद लावलात. सर्वांच्या मनाला तुमचीच ओढ उत्पन्न केलीत. गेलात तेसुद्धा स्मृतींचा सुगंध मागे ठेवून. त्या दोन दिवसांत माझा जीवकण तुमच्या मध्यबिंदूभोंवतीं फिरत होता. आई दुखणें विसरली होती. तिनें केलेले कष्टच तिला विसाव्यासारखे झाले होते. पण तुमचें पत्र हातीं पडल्यापासून सगळें गाडें पालटलें आहे. आईच्या रुग्ण, जर्जर हृदयाला हा आशाभंग सोसला नाहीं. अण्णा कमालीचे बेचैन झाले आहेत. त्यांना रात्रीं थोडा वेळ तरी झोंप लागली होती कीं नाहीं देव जाणे! अन् मी—पण कशाला माझ्या हृदयाचें कारुण्य तुमच्यापुढें प्रगट करूं! काय उपयोग आहे त्याचा! त्या वेळच्या एकंदरींत तुमच्या बोलण्याचालण्यावरून तुम्ही आमची अशी निराशा कराल असें आमच्या घरांत कुण्णाकुण्णालासुद्धा वाटलें नव्हतें. कोणत्या कारणासाठीं तुम्ही नकार कळविलात त्याविषयीं मला निश्चित काहीं तर्क करतां येत नाहीं. कदाचित् मी तुमच्या परीक्षेला उतरलें नसेन. कदाचित् आमच्या आर्थिक दुबळेपणामुळें तुम्हांला हा संबंध इष्ट वाटला नसेल. तुम्हाला दोष देण्यासाठीं हें पत्र मी लिहीत नाहीं. अंतरांतली खळबळ बाहेर टाकण्यासाठीं योजलेला हा एक दुबळा उपाय आहे. मन थोडें ताळ्यावर आलें कीं मग शांतपणें भवितव्याचा विचार करीन.

अभागिनी
सुनंदा

—९—

बंगलोर

ता. १५-३-४९

सादर नमस्कार वि. वि.

तुमचें पत्र मिळालें. त्यांतल्या प्रत्येक शब्दामागें असलेली व्यथा जाणवली. तुमच्या आशा अंकुरित करून लगेच त्या करपवून टाकण्याच्या अपराधाबद्दल मला केवढीहि कठोर शिक्षा मिळाली तरी ती थोडीच होईल. मोकळ्या मनानें तुमची क्षमा मागायचीसुद्धा सोय उरली नाहीं. पण तरीहि हा निर्णय मी कां घेतला त्याचीं कारणें तुम्हांला कळवण्याचें धाष्टर्य करीत आहें. तीं जर तुम्हाला पटलीं तर माझ्या अपराधाचें स्वरूप बरेंच सौम्य होईल.

मी जेव्हां तुमचा फोटो पुढें ठेवून स्वतःबद्दल विचार करूं लागलों, तुमच्या शेजारी जेव्हां कल्पनेनें उभा राहिलों, तेव्हां मला स्वच्छ कळून चुकलें कीं, मी तुम्हाला पति म्हणून योग्य नाहीं. माझा पाय हा असा जन्माचा अधू. व्यंग मोठें अन् शिवाय लपवतां न येण्याजोगें. तुम्ही कशा हें वर्णन करायची जरूर नाहीं. तुमच्या जोडीनें मी चालूं लागलों तर लोक तें पाहून तुमची कींव अन् माझा उपहास करतील. अशा स्थितींत तुमच्याशीं लग्न करणें म्हणजे पैशाच्या बळावर तुम्हाला विकत घेतल्यासारखें होईल तें. आज तुम्ही या गोष्टीला राजी आहां; पण उद्या तुम्हांला केल्या गोष्टीचा पश्चात्ताप न वाटेल हें कोणी सांगावें ! मनुष्य अडल्या स्थितींत ' पदरीं पडलें तें पवित्र ' मानतो; पण मागाहून शहाणपण जागें होतें अन् त्याला टोचूं लागतें. अव्यंग, अनुरूप अशीं जोडपीं आणि त्यांचा ठाकठीक संसार पाहिल्यावर आपली फसगत झाली, आपण आंधळेपणें या पांगळ्याला निवडलें हें शल्य जन्मभर तुमच्या मनांत सलत राहील. कदाचित् तुम्ही माझा तिरस्कारही करूं लागाल. माझ्याशीं लग्नगांठ बांधून तुम्ही जन्माच्या व्यथित अन् उदास व्हावें हें मला रुचणार नाहीं. माझ्या दृष्टीनेंहि त्यांत हानि आहे.

तुमची कष्टी मुद्रा जेव्हां जेव्हां मी पाहीन तेव्हां तेव्हां मला वाटेल कीं आपण अनुचित केलें. तुम्हांला परोपरीनें खूष ठेवण्याचा प्रयत्न करणें हा एक मला नवा उद्योग होऊन बसेल. याच अपराधी जाणिवेंतून जो एक न्यूनगंड निर्माण होणें शक्य आहे, तो कदाचित् माझ्या सगळ्या व्यवसायाला बाधक ठरेल. घरांतला तेजोभंग बाहेरच्या जगांतहि माझी मान वांकवील.

या सगळ्याचा मथितार्थ हा कीं जिला मी शोभेन अशीच एखादी वधू मला निवडली पाहिजे. जिला माझ्यासारखा वर भाग्याचा वाटेल अशीच ती असली पाहिजे. लंगड्यानें तांबड्या पैशावरच संतुष्ट राहिलें पाहिजे. सोन्याच्या नाण्याची त्यानें हांव धरूं नये. सुनंदादेवि ! तुम्हांला नाकारण्यांत मी तुमचा अपमान करीत नसून तुमच्या रूप–गुणांचा सन्मान करीत आहें असेंच मला प्रामाणिकपणें वाटतें.

ही पश्चाद्बुद्धि आहे हें मला कबूल. तुम्हाला पाहिलें त्याच वेळीं हे विचार सुचायला हवे होते. पण तुमच्या दिव्य दर्शनानें माझी विवेकशक्ति झांकळून गेली. गुलाबाच्या पाकळ्यानीं घडवल्याइतकी कोमल आणि चांदणें गोठवून बनवल्याइतकी शांत, संजीवक नारी तुमच्या रूपानें प्रथमच मी पहात होतों. त्या वेळीं मला आत्मविस्मृति झाली नसती तरच नवल !

असो. माझे सद्भाव तुम्ही ओळखूं शकाल म्हणूनच हा एवढा शब्दप्रपंच केला. तुमच्या बाबतींत माझी एकच आकांक्षा राहील कीं ' रत्नं समागच्छतु काञ्चनेन !'

तुमचा

जयवंत

—१०—

पुणें

ता. १८–३–४९

प्रिय जयवंत,

तुम्ही तत्परतेनें पाठवलेलें विस्तृत पत्र मिळालें. त्यांत तुमचे मनोभाव स्पष्ट समजले. नकाराचीं कारणेंहि ध्यानांत आलीं. याउपर तुम्हांला आणखी ताप देणें उचित नव्हे. पण तुमच्या नकाराच्या तटबंदींत एक लहानशी फट आहे; तिच्यांतून मला आंत प्रवेश मिळूं शकेल कीं काय हें पाहण्याचा स्वार्थ अनावर होतो. खरोखर तुमच्या पत्राला उत्तर देणें कठीण आहे. कारण त्यांतली विचारसरणी तुमच्या दृष्टीनें बिनतोड आहे. शिवाय ती केवळ आपस्वार्थी नाहीं. त्यांत परार्थाचीहि योग्य ती कदर केलेली आहे.

पण आतां माझेंहि थोडेंसें ऐका. तुम्ही समजतां तितकी मी आंधळी नाहीं अन् अडलेलीहि नाहीं. तुमच्या शारीरिक व्यंगाकडे माझें लक्ष गेलें नव्हतें असें नाहीं. आतांहि त्याची मला जाणीव आहे. आणि तरीहि मी त्याचा बाऊ केलेला नाहीं. जें व्यंग तुमच्या पराक्रमाच्या आड आलें नाहीं, तें माझ्या प्रेमांत तरी कां म्हणून आड यावें ? तुम्ही दिसलांत त्याच क्षणीं माझ्या मनानें कौल दिला कीं, तुला हवें होतें तें हें बघ सगुण साकार होऊन तुझ्यापुढें आलें आहे. मी त्या दृष्टीनें तुम्हांला न्याहाळूं लागलें. दादाच्या पत्रांत जें तुमच्याबद्दल वाचलें होतें, त्याचा मला साक्षात् अनुभव घडला. भक्तीला निष्ठा जोडली. मी मनाशीं निश्चय केला कीं, या पुरुषाचें जें अपुरें अंग आहे, तें आपण निजांगें पुरें करायचें. तुमच्याशीं जीवेंप्राणें एकरूप झाल्यावर पश्चात्ताप करायला मी वेगळी उरेनच कुठें ! जो पुरुष मोठ्या लाभाच्या वेळींसुद्धा दुसऱ्याचा विचार करूं शकतो, जो आपल्या भावनांच्या आधीं दुसऱ्याच्या भावनांना मान देण्याचें सौजन्य

दाखवतो, त्या पुरुषाचें आत्मिक सौंदर्य स्त्रियांना किती लोभनीय वाटत असेल तें आमचें आम्हीच जाणूं शकतों.

" रत्नं समागच्छतु काञ्चनेन " हा तुम्ही त्या पत्राच्या शेवटीं दिलेला आशीर्वाद जर समर्थांच्या मुखांतून निघालेला असेल तर तो सफल करण्याची जबाबदारी तुमच्यावरच येते, असें मी समजतें. अधिक काय लिहूं !

सदैव तुमचीच
सुनंदा

—११—

बंगलोर
ता. २१-३-४९

प्रिय सुनंदा,

तुझें पत्र वाचून मला अत्यंत समाधान झालें. या समाधानाच्या भरांतच मी माझा बदललेला निर्णय तुला कळवीत आहें. माझ्यापेक्षांहि या गोष्टीचा तूं अधिक खोल विचार केला आहेस हें त्या पत्रानें सिद्ध झालें. माझी शहाणपणाची आढ्यता बरीचशी खालीं उतरली. माझा पराभव झाला खरा; पण विजयापेक्षांहि तो अधिक आस्वाद्य आहे. दैव जर मला आपण होऊन सोन्याच्या पालखींत बसवायला तयार आहे, तर मी तरी कशाला कुरकुर करूं ? पुढच्या सर्व गोष्टी तुझ्या दादाशीं पत्रव्यवहार करून ठरवीन. ' शुभंच शीघ्रम् ! '

सर्वस्वी तुझाच
जयवंत

—१२—

पुणें

ता. ३०–३–४९

प्रिय दादा,

काल पुन्हां बंगलोरचें पत्र आलें. लखोटा जाडजूड वाटला म्हणून उत्कंठेनें फोडला. पहातें तों आंत दोन पत्रें. एक जयवंतांचें अन् दुसरें अनोळखी अक्षराचें. एक गुलाब अन् दुसरा कांटा! अनोळखी पत्र जयवंतांच्या नांवचें होतें तें आधीं वाचूं लागलें. वाचतां वाचतां सर्वांगावर कांटाच उठला. जयवंतांचा हा 'अज्ञात हितचिंतक' माझ्याविषयीं काय काय गरळ ओकला आहे त्या पत्रांत! 'पुण्यास आल्यावर या पत्राचा मी योग्य तो परामर्श घेईन; तोंवर हें जपून ठेवावें' असें जयवंत मला लिहितात. पण एवढ्यावर या पत्राची त्यांच्या मनावर काय प्रतिक्रिया झाली आहे तें कळत नाहीं. ते परामर्श घेणार म्हणजे काय करणार? त्या निरर्गल आरोपांबद्दल मला जाब विचारणार? मी काय सांगूं त्यांना? असले आरोप नाकारायला सुद्धां कुलस्त्रीची जीभ धजावणार नाहीं. आणि इतकें करूनहि त्यांचें मन निःशंक झालें नाहीं तर? ते दिलेलें वचन मोडतील? या प्रकारानें माझ्याभोंवतीं रान उठल्यासारखें झालें आहे. जयवंत पुण्याला येतील तेव्हां याचा काय तो सोक्षमोक्ष व्हायचा. तोंवर टांगल्या तलवारीखालीं रहाणें भाग. दंश करून प्राण कासावीस करणारे जीव–जिवाणू अदृश्यपणें आपल्याभोंवतीं सरपटत असतात ही गोष्ट आजवर मला कळलेली नव्हती. हा त्या गोडबोल्यांचाच आगलावेपणा असला पाहिजे. तीं माणसें तसल्याच जातीचीं आहेत. आपला स्वार्थ साधत नाहीं, तर दुसऱ्याच्या सुखांत विब्बा घालायला तीं मागेंपुढें पहाणार नाहींत. आम्ही त्यांना भीक घातली नाहीं त्याचा सूड त्यांनीं असा उगवला. आज तरी

माझ्या जिवाला इंगळ्या लावून ते विजयी झाले आहेत. दादा, कांहीं सुचत नाहीं रे ! तूं येत्या शनिवारीं घरीं येशील का ?

तुझी
सुनंदा

—१३—

ता. ७–४–४९

बंगलोरची तार—

येत्या बुधवारीं मेलनें येत आहें.

—जयवंत

—१४—

पुणें
ता. ११–४–४९

प्रिय दादा,

तापल्यानंतर सावलीची आणि पावसाच्या संततधार वृष्टीनंतर सूर्यदर्शनाची जी अपूर्वाई असते तीच आज माझ्या सुखाला आली आहे. पुनवेच्या भरतीच्या उंच लाटेवर बसून तुषारांच्या मोत्यांनीं मी तुला हें पत्र लिहीत आहें. तारेप्रमाणें हे बंगलोरहून बुधवारीं आले. त्यांना दारांत पहातांच माझ्या उरांत धस्स झालें. ती. अण्णांनीं त्यांचें स्वागत केलें. त्यांच्या दृष्टींत विष आहे का अमृत आहे याचा मी ठाव घेऊं लागलें. पण दादा, तिथें अमृतच होतें. मी वेडीनें उगाच धसका घेतला होता. जेवणें झाल्यावर तो विषय निघाला. मी माझी शंका त्यांना सांगितली. पूर्वेतिहास समजल्यावर त्यांना ती एकदम पटली. ते मला म्हणाले,

"तें पत्र कुठें आहे तें आण."

मी तें त्यांच्या हातांत देत म्हटलें, 'काडी लावा त्याला.'

" काडी तर लावायचीच आहे; पण ती तुझ्या माझ्या हातून नव्हे. त्यासाठीं योग्य इसम पाहूंया सांपडला तर—"

माझ्याकडून गोडबोल्यांचा पत्ता विचारून घेऊन त्यांनीं कपडे चढवले. ते बाहेर पडल्यावर मी मधल्या वेळच्या तयारीला लागलें. दोन तासांनीं त्यांचा टांगा दारांत येऊन थडकला. आंत शिरतांच त्यांनीं मला हाक मारून म्हटलें.

" सुनंदा, चहा ठेव लवकर. माझ्याबरोबर एक पाहुणे आले आहेत. "

" दादा, हे पाहुणे कोण असतील असें वाटलें तुला ? अरे दुसरे कोण ? गोडबोल्यांचें खप्पड ध्यान ! " माझ्या कपाळावर आंठ्या चढलेल्या पाहून हे मला म्हणाले.

" माझे ' अज्ञात हितचिंतक ' ते हेच बरं का ! ओळख ना देख; पण तरी सुद्धा माझ्या कल्याणाची हे काळजी वहातात– "

यांच्या डोळ्यांत कुठला विखार भरला होता त्या वेळीं कोण जाणे ! गोडबोल्यांनीं एकदम मान खालीं घातली. ते बसल्या जागेवरून उठून ओढलेल्या आवाजांत मला म्हणाले.

" माझी चूक झाली. मला क्षमा करा ! "

संपत्तीच्या तोऱ्यांत उताणा चालणाऱ्या त्या डबोलेवाल्याचा काळा पडलेला चेहरा पहायला तूं हवा होतास दादा त्या वेळीं. यांनीं त्याला कसला एवढा दम भरला होता देव जाणे ! बाकी, पाप हें नेहमींच भित्रें असतें म्हणा ! यांनीं लगेच तें पत्र आणि खिशांतली काड्यांची पेटी त्याच्यापुढें केली. पेटलेली काडी त्या घाणेरड्या पत्राला लावणारा त्याचा हात किती थरथरत होता ! ज्वाळा घेऊन तें पत्र खालीं पडलें आणि जमिनीवर पुरतें जळलें. त्याची काळी राख वाऱ्यानें उडवून लावली. गोडबोल्यांनीं बाहेरचा रस्ता धरला.

" अहो, निघालांत कुठें ? चहा घेऊन चला ना ! "

हे त्याला म्हणाले. पण एवढी पाद्यपूजा त्याला पुरेशी झाली होती. तो कसला थांबतोय्! अन् थांबायला हवा होता तरी कोणाला! यांनीं माझ्याकडे पाहिलें.

" पत्राचा परामर्श योग्य झाला ना?"

मी काय बोलणार! माझें हृदय कांठोकांठ भरलें होतें. शब्दाला तिथें जागा नव्हती. श्रावणांतल्या जुईसारखी मी पानोपांनीं फुललें होतें. दृष्टि त्यांच्या मुखावर पांगुळली होती. त्या मुखाचा भार मला पेलेना. वाटलें कीं, मी खालीं पडेन. माझी पुलकांकित नाजूक काया झोकून द्यायला मला त्या वेळीं आधार हवा होता. तो होताहि. अगदीं जवळ. एका हाताच्या अंतरावर. पण...पण...

अजून अंतरपाट दूर झाला नव्हता!

दादा, अधिक काय लिहूं! तुला म्हणूनच इतकें लिहिलें.

तुझी

सुनंदा

---

# माझं गुरुकुल ७

मुंजीच्या दिवशीं मुंजा मुलगा लंगोटी नेसून, तिपेडी दर्भमेखला कमरेंत बांधून, जानव्यावर पंचा पांघरून अन् हातीं दंडकाष्ठ घेऊन उपाध्याच्या पुढें उभा राहिला कीं, त्याला ब्रह्मचाऱ्याचे धर्म उपदेशितात : 'संध्या करायची, अग्निकार्य करायचं आणि गुरुगृहीं राहून विद्या शिकायची ... '

अलीकडचीं मुलं हें या कानानं ऐकतात अन् त्या कानानं सोडून देतात. कारण त्यांना त्या उपदेशापैकीं कांहीच करायचं नसतं. पण माझ्या बाबतींत मात्र हें सगळं साग्रसंगीत गळ्याशीं आलं. आठवं वर्ष संपतं न संपतं तोंच आजीनें माझी मुंज बांधली आणि सोडमुंज करण्यापूर्वीच ठरवून टाकलं कीं, 'याची आतां ताबडतोब गुरुगृहीं रवानगी करायची. शास्त्री–पंडितांच्या घराण्यांतला मुलगा, तेव्हां तो सुद्धां व्युत्पन्न, दशग्रंथी झालाच पाहिजे. त्यानं कुळपरंपरा राखायलाच हवी.'

आमच्या गांवांत फक्त 'कोंडेबार' शिकायची तेवढी सोय होती. बाकी सगळा वषट्कार. सगळेच एकाहून एक अरण्यपंडित ! तेव्हा शेजारच्या गांवांत एक शास्त्रीबुवा होते त्यांचे पाय धरणं आजीला भाग पडलं. तिनं त्यांच्याच घरीं माझी रहाण्याची व्यवस्था केली आणि रामनवमीच्या दिवशीं माझ्या प्रस्थानाचा मुहूर्त निश्चित केला. त्याच्या आदल्या रात्रीं मी आजीच्या कुशींत अधिकच बिलगून झोपलों. तिची दाट शिवणीची गोधडी मीं सर्वांगाभोंवतीं लपेटून घेतली. उद्यांपासून मला

ही आजीची ऊब मिळणार नव्हती. डोळ्यांत राहून राहून अश्रू येत होते. ती गोधडी सारखी भिजत होती. आजवर आजीची कूस मला कधीही अंतरली नव्हती. तिच्यावेगळं मला अस्तित्व नव्हतं. तिलाही माझ्यावांचून क्षणभर करमत नसे. पंचप्राणांची पांखर घालून तिनं मला वाढवलं होतं. माझे वडील लहानपणींच वारले होते. मुलगा गेल्यामुळें तिच्या अंतरांत उठलेली दुःख-शोकाची आग मींच थोडीबहुत शमवली होती. पण तीच आज मला दूर करायला कां प्रवृत्त झाली, एवढी कशी कठोर झाली, तें मला कळेना. 'तुझ्या हितासाठीं, कुळाच्या कीर्तीसाठीं' असं कांहीं तरी ती मला सांगे; पण आजीपासून दूर होऊन माझं हित कसं होणार, तेंच मला कळत नव्हतं.

सकाळीं तिनं मला न्हाऊं घातलं. तूप-मेतकूटासह आटवल जेवायला वाढलं. माझ्या लंगोट्या, पंचे, अन्- पांघरुणं एका गांठोड्यांत बांधलीं. सुपारी ठेवून देवाच्या पायां पडायला लावलं. तिनं देवाला काय प्रार्थिलं असेल तें कांहीं मला ऐकायला आलं नाहीं. 'चल आतां,' एवढेच शब्द माझ्या कानांत पडले आणि तेहि अश्रूंच्या खळाळासह. मीं एकदम तिच्या मांड्यांना मिठी घातली.

ती मला पोंचवायला निघाली. ती गुरुजींच्या गांवीं त्यांच्या घरापर्यंत मला पोंचवणार होती. त्यांच्या हातीं मला निरवूनच ती परतणार होती. आजवर मी कधीहि गांवाची शीव ओलांडली नव्हती. आजीनं मला कुठे पाठवलं नव्हतं अन् तिनंहि क्वचितच पाय बाहेर टाकला होता.

कष्टी मनानं मी बाहेर पडलों खरा; पण पांच मैलांच्या ह्या प्रवासांत अनेक दृश्यें माझ्या खिन्न मनाला आकर्षित करूं लागलीं. एक भली मोठी चिरेखण वाटेंत आली. तिच्यांतले कमजास्त खोलगट भाग पाहून मला वाटलं कीं, ही जागा लपंडाव खेळायला छान आहे. त्यापुढें एका डोंगराच्या कण्यानं जात असतां उभ्या पायथ्याशीं एक घर होतं अन्

त्याच्या अंगणांत उभी राहून एक म्हातारी वर आमच्याकडे पहात होती, ती मला एवढीशी टीचभर वाटली. त्याच डोंगराच्या पायथ्याशीं एक कुळागर अन् त्यापुढें एक रुंद वहाळ लागला. या वहाळाला पाणी बरंच होतं. पलीकडे जाण्यासाठीं पोफळींच्या डांबांचा सांकव घातलेला होता. त्यावरून पैलपार होतांना मी कुठल्या तरी निराळ्याच जगांत प्रवेश करीत आहें अशी एक गंभीर जाणीव मला उत्पन्न झाली अन् वरची लांबच लांब पाळंद ओलांडीपर्यंत ती टिकली. पुढेंहि चढावच होता आणि त्यावरचीं काजूचीं झाडं फळभारानं लवलीं होतीं. वाऱ्यानं झाड हललं कीं, पडणारा बोंडू, पडल्या जागेवरून चार हात तरी घरंगळत खालीं येत होता अन् मला त्याची गंमत वाटत होती.

हेंच काजूबन ओलांडून पुढें गेल्यावर आंबे—फणसांच्या सावलींत चार पांच घरांचा एक पुंज होता. मधूनच एक लहानसा पाट झुळझुळ वहात होता. चार घरं पाटाच्या वरच्या बाजूला ओळींत नांदत होतीं. फक्त एकच केंबळी घर पाटाच्या खालच्या बाजूला एका उंच आंब्याच्या खालीं बसलं होतं अन् तेंच माझं गुरुगृह होतं. मी पाण्यांत पाय न बुडवतां पाटावरून उडी मारून पलीकडे गेलों, पांच सहा मातीच्या उंच पायऱ्या उतरलों आणि गुरुजींच्या पडवींत दाखल झालों.

घरच्या मंडळीनें माझ्या आजीचं अगत्यपूर्वक स्वागत केलं. गुरुजी अंगावर उपरणं टाकून झोपाळ्यावर बसले होते. आजीनं मला त्यांना साष्टांग नमस्कार घालायला लावलं. गुरुजी सौम्य होते, हंसरे होते. त्यांना पाहून माझ्या काळजांतली अर्धी भीति मावळली. पण तें मावळलेलं भय पुन्हां परत येणार आहे अन् माझ्या हृदयांत कायमचं घर करणार आहे याची मला काय कल्पना!

या भयाचा उत्पादक पुरुष म्हणजे दत्तूमामा. तो आमच्या गुरुजींचा मामा होता आणि सडाफटिंग असल्यामुळें भाच्याचा संसार करायला त्याच्याच घरीं येऊन राहिला होता. मी त्याच्यापुढें आडवा होऊन उठलों.

पण क्षणभरसुद्धा मला त्याच्या मुद्रेकडे पहावेना. शंकराच्या भालनेत्रांतली आग त्याच्या दोन्ही डोळ्यांत रंगाच्या रूपानें अवतरली होती. त्याच्या मिशांचे आंकडे माझ्या काळजांत बोचूं लागले. त्याचं रुंद थोबाड माझा श्वासोच्छ्वास गुदमरवूं लागलं. आणि त्याची ती कंपवातानं धडावर सतत थरथरणारी मान—त्याच वेळीं माझ्या मनानं त्याचा धसका घेतला. वाटलं कीं, आजीच्या कुशींत शिरावं अन् तिला म्हणावं, 'चल, ऊठ लवकर, मला घरीं घेऊन चल!'

तो झोंपाळ्यावर बसला. मी खालीं उभा राहिलों. त्याची रोखलेली दृष्टि माझ्यावर अन् माझ्या तळपायांना घाम. तो वाघ आणि मी कोकरूं. त्या वेळीं झालेलीं त्याचीं—माझीं प्रश्नोत्तरं अजून माझ्या कानांत निनादतात.

"नांव काय तुझं?"

"भ...भ...भ ऽ ऽ ऽ"

"भ भ काय? नीट बोल कीं!"

"भ ऽ भल्ू!"

"बापाचं काय?"

"बाप नाहीं!"

"तें समजलं; पण नांव आहे कीं नाहीं?"

"आहे."

"मग सांग कीं!"

"पुरुषोत्तम."

"शिकणार आहेस का?"

मीं फक्त मान हलवली. थोड्या वेळानं आजी मला त्या वाघाच्या गुहेंत सोडून निघून गेली. मला रडावंसं वाटलं; पण मी रडूं शकलों नाहीं. समोर तो काळपुरुष उभा होता ना! अश्रूच काय; पण माझं रक्तसुद्धा

गोठलं होतं. मी पाटापलीकडे जाऊन टकटक करीत आजीला खोपीआड होईपर्यंत पाहिलं आणि त्याच क्षणीं अनाथ झालों.

आता मला दत्तूमामाच्या सावलींत वागायचं होतं. किती दिवस याला मुदत नव्हती. मी विद्वान् झालों असं आजीला वाटेपर्यंत या वाघाच्या गुहेंतून माझी सुटका होणार नव्हती. माझे गुरुजी हंसरे होते, सौम्य होते; पण उपयोग काय ? दत्तूमामा तर त्यांचाहि 'सासरा' होता. गुरुजींची बायको वेणाक्का त्याच्यापुढें अंग चोरून वागते हें तेवढ्यांत मला कळून आलं. या घरांतलीं सगळींच माणसं भयभीत आहेत असं मला वाटलं. पण त्यांत माझा फायदा नव्हता. सगळ्यांत लहान मी, तेव्हां माझाच अधिक चेंदा निघायचा, हें ठरलेलं. दत्तूमामानं सगळ्यांवर डोळे वटारायचे आणि त्यांनीं त्याचं साग्रसंगीत उट्टं माझ्यावर काढायचं.

त्या लहानशा वाडींत मुलांपेक्षां मुलीच अधिक होत्या. पाटाखालच्या घरीं एक नवा मुलगा आला आहे हें कळतांच एकेकटी चिचुंद्रीसारखी मला पहाण्यासाठीं खालीं उतरूं लागली. इंदू आली, काशी आली, भागू आली अन् कावीहि आली. सगळ्याजणींनीं मला पाहून घेतलं. मी पडवीच्या पेठाळ्यावर खिन्न उदास होऊन बसलों होतों अन् प्रत्येकीचे तिरके कटाक्षबाण सोशीत होतों. एक इंदू सोडली तर बाकीच्या सगळ्या मुली मला जहांबाज वाटल्या. चुरुचुरु प्रश्न विचारून त्यांनीं वेणाक्काकडून माझ्याबद्दल बरीच माहिती काढून घेतली. इंदू जातां जातां म्हणाली, 'आम्हांला 'राजाचं भात' खेळायला आणखी एक गडी मिळाला !' ती माझ्याच वयाची होती. तिचे ते शब्द आणि तिनें केलेलं भावगर्भ स्मित पाहून मला वरदान मिळाल्यासारखं वाटलं. इथें—अन् खेळायला मिळणार ही कल्पनाच मला अभिनव होती.

त्यानंतर आला बाबल. हा माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं थोर होता अन् तरीहि अजून लंगोटीच घालीत होता. पाटाच्या वर समोरच घर होतं,

तें त्याचं. त्यानें माझ्याकडे पाहिलं अन् मीहि त्याच्याकडे. ‘ याच्याशीं माझं जमेल का ? हा मला आपल्या संगतींत घेईल का ? नाहीं तर या मुलींच्या तांड्यांत मी बायकांत पुरुष लांब्रोडा व्हायचा ! ’ मला थोड्याच वेळांत कळलं कीं, तोहि आमच्या गुरुजींकडे सकाळ–संध्याकाळ त्रिसुपर्ण घोकतो आहे. मीं मनाशीं म्हटलं, ‘ हें तर छानच झालं. आपण सहाध्यायी झालों कीं सहजच मित्र बनूं. ’ पण तो होता आपल्या घरीं अन् मी परघरीं. साहाजिकच तो बलवान् होता आणि मी दुर्बल होतों. त्या वाडीवरचीं सगळीं माणसं मी पाहिल्याच दिवशीं पाहिलीं. लहान तशींच मोठीं. पण कुणाविषयींच माझ्या मनांत आपुलकी निर्माण झाली नाहीं. इंदु तेवढी मला सगळ्यांत निराळी वाटली. ती आणखी एकदां तरी येऊन जाईल का, म्हणून संध्याकाळपर्यंत मीं वाट पाहिली.

रात्र पडली तेव्हां जेवायला कधीं मिळेल यापेक्षा झोंपायला कुठें मिळेल, याच विवंचनेंत मी पडलों. उघड्या पडवींत दत्तूमामाच्या शेजारीं अंथरूण टाकायला सांगतील कीं काय, या मरणाला मी भीत होतों. पण उपकार देवाचे कीं, मला माजघरांत पथारी पसरायला सांगितलं. माझ्या शेजारीं कोंपऱ्यांतल्या खुंट्याला लहानगं वासरूं बांधलेलं होतं. ती मोनजात अन् मी वाणी असून मुका. दोघंही समानशील. मी त्या वासराच्या पाठीवरून हळूच हात फिरविला, तर तें खडबडून उठलं. माझ्या पोटांत एकदम धस्स् झालं. वासराचं भय म्हणून नव्हे; तर ‘ काय केलंस रे ’ म्हणून कोणी हटकील या कल्पनेनं. मीं ताबडतोब घुंगट घेऊन झोंपेचं सोंग केलं.

थोड्या वेळानं फराळ आटपून गुरुजींची म्हातारी आईही माझ्या शेजारीं झोंपायला आली. मला एकदां वाटलं कीं, ही आपल्या आजीसारखीच आहे; हळूच हिच्या कुशींत शिरावं. पण अंथरुणावर अंग टाकण्याच्या आधीं ती आपल्याच मांडोवर झोंपली अन् तिनं हातांनीं पायांचे आंगठे

धरीत तशाच स्थितींत तुकारामाचे अभंग सुरू केले. ‘ जन्माचें तें मूळ पाहिलें शोधूनी...’ मला तें एकदम भुताटकीसारखं वाटलं. तिच्याविषयीं जडूं पाहणारी माया एकदम आटली. आणि मीं मनांत एकदम ठरवून टाकलं कीं, ‘ आपण एकटंच झोंपायचं. ही आजी जवळ घ्यायला लागली तरी पटकन दूर व्हायचं. ’

सकाळीं वेणाक्काला भुईचाफीं द्यायला आलेली इंदू दिसली. ‘ भद्र, तुला हवं ? ’ म्हणून तिनं माझ्यापुढेंही एक धरलं. पण मला कुठें धीर होता तिच्या हातून तें घ्यायचा ! पण तेवढ्यानेंच प्रसन्न होऊन मी बाबलाबरोबर संथा म्हणायला बसलों. एक चरण सात वेळां म्हणायचा, बोटं दुमडून अन् सोडून ती संख्या मोजायची, सात भरल्यावर एक टाळी वाजवायची अन् लगेच दुसरा चरण सुरू करायचा. पण बाबलानं टाळी आपल्या हातावर वाजवायची ती वाजवली माझ्या उघड्या मांडीवर ! मी कळवळलों अन् तो हंसला. मी ज्याला मित्र करायला जाणार होतों त्यानं आपल्या मैत्रीचा आरंभ हा असा केला होता. पण हें त्यानं एकदांच केलं अन् पुन्हां तो माझ्या वाटेला गेला नाहीं, म्हणून बरं !

आमची संथा म्हणून होते तों पाटाच्या पाण्याचा ओझर अंगणाच्या मेरेपलीकडे ओतूं लागला. पुरुषभर उंचीवरून पडणारा तो दुधिया प्रपात पाहून मला वाटलं कीं, त्याच्याखालीं उभं राहून सुस्नात व्हावं. पण दत्तू-मामाचे डोळे मला पहात होते. दुसरं आकर्षण चुडतांच्या माचापलीकडच्या पपनशीचं. केवढालीं पपनसं घडाघडांनीं तिच्या डहाळ्यांना लोंबत होतीं! माझ्या तोंडाला पाणी सुटलं; पण दत्तूमामाचं खाकरणं ऐकून तेंही लगेच सुकलं. आज गुरुजींच्या कुळागराचं शिंपणं होतं. दत्तूमामा कळें घेऊन शिंपायला जातांना मला म्हणाला. ‘ चल रे पोरा पाणी मोडायला ! ’ मी त्याचा संपर्क टाळूं पहात होतों; पण तो मला आपल्या डोळ्यांखालीं ठेवूं इच्छीत होता. ‘ बळी तो कान पिळी ! ’ दुसरं काय ?

गुरुजींच्या कुळागराला लागूनच गडग्याच्या पलीकडे बाबलाचं कुळागर होतं आणि तो त्याच वेळीं चुडतं गोळा करायला तिथें आला होता. त्यानं मला हांक मारली आणि मी दत्तूमामाचा डोळा चुकवून तिकडे गेलों. तो मला म्हणाला, ' तुमच्या कुळागरांत तो पलीकडच्या मागावर फणस दिसतो का ? त्याच्याखालीं केवढी ' रोहिण ' वाढली आहे पाहिलीस ? तिच्या आंत एक मोठा देवचार रहातो. रात्र पडली, सगळीं माणसं झोंपलीं कीं, तो वाडींत फिरतो. जो जागा असेल त्याला त्याच्या जुत्याचा ' कर्र, कर्र ' आवाज अन् घागऱ्या लावलेल्या काठीची ' खुळखुळ ' ऐकायला येते. तें जुतं उलटं असतं बरं का. कारण त्याचे पायच उलटे आहेत. त्याचं नांव आहे बाठारी. तूं जाऊं नकोस हं त्या बाजूला. एखादे वेळीं तुझा गळा आंवळायचा. गळा आंवळला कीं, प्राण जायला वेळ लागत नाहीं ! '

बाबल माझ्या पोटांत भयाचा वायगोळा उठवून फराफरा चुडतं ओढीत निघून गेला. आमच्या गांवांत देवचार होता, पण तो इतका मनुष्यवस्तीला जवळ नव्हता. इथला सगळाच प्रकार और ! दत्तूमामाचा पलीकडचा माग शिंपून झाला होता, तेव्हां मीहि मग दुसऱ्या मागाला पाणी मोडण्यासाठीं मधल्या पाटावर जाऊन उभा राहिलों. थोड्याच वेळांत देवचाराच्या फणसाकडे जाणाऱ्या मागांत पाणी वाहूं लागलं. त्याच्याखालीं दोन चुडतं पडलेलीं होतीं. आणि तीं शिंपतांना भिजून निरुपयोगी होणार होतीं. दत्तूमामाची तिकडे नजर गेली अन् तो मला म्हणाला.

" ए भल्या ! तीं चुडतं गोळा करूनं आण जा. "

हाय रे दैवा ! तो मला देवचाराच्या झाडाखालीं जायला सांगत होता. एक चुडत तर नेमकं त्या रोहिणीवरच पडलं होतं. कसं जायचं तिकडे ? कसा हात घालायचा त्याला ? मला वाटलं, दत्तूमामा पाहुण्याकडून साप मारवतो आहे. जमलं तर चुडतं हातीं लागतील, मेला तर एक परका मुलगाच मरेल. हा आपला सुरक्षित. माझे पाय जागचे हलेनात. घशांत

' चक्-चक् ' होऊं लागलं. करुण दृष्टि दत्तूमामाच्या चर्येवर खिळली.

" बघत काय राहिलास ?. भैरा आहेस कीं काय ? जा लवकर तीं चुडतं आण ! "

अरे बाप रे ! काय ते लालगुंज डोळे ! मला वाटलं, दत्तूमामाच जिवंत देवचार आहे. वाठाऱ्याच्या आधीं हाच मला गिळील. इच्छेविरुद्ध माझे पाय त्या रोहिणीकडे जाऊं लागले. माझ्या सगळ्या वृत्ती एकदम थिजून गेल्या होत्या. मी जिवंत असून मेलों होतों. कळसूत्री बाहुलं झालों होतों. त्या चुडतांना मीं कसा हात घातला, तीं गोळा करून मी कसा परत जाग्यावर आलों, तें माझं मलाच कळलं नाहीं. ' जा आतां घरीं, ' म्हणून दत्तूमामाचा हुकूम होतांच मग मात्र मी जीव घेऊन तिथून पळालों. त्या रात्रीं मला किती तरी वेळ झोंप लागली नाहीं. माझ्या शेजारचं तें वांसरूं पहिली झोंप घेऊन उठलं, उभं राहून मुतलं, त्याचे तुषार माझ्या अंथरु-णावर उडाले, हें सगळं मला त्या अंधारांत कळलं. त्या देवचाराच्या जुत्याचा ' कर् कर् ' आवाजही ऐकूं आला आणि त्याच्या घागऱ्या लावलेल्या काठीची ' खुळखुळ' सुद्धा ! आणि मी निजल्या जागीं घामानं निथळलों. पण कोण माझा घाम पुसणार ? माझी आजी थोडीच होती तिथें !

सकाळीं संथा म्हणून झाल्यावर पाटांतून चुबुक चुबुक करीत सगळ्यांत वरच्या देवण्यावर जायचं, तिथं अंघोळ करायची, तिथल्या पाथरीवर फटाफटा आपटून लंगोटी अन् पंचा धुवायचा, त्या अग्रोदकानं तपेलं भरून घ्यायचं, ओल्या पंचाची चुंबळ करून डोक्यावर ठेवायची, तिच्यावर तपेलं चढवायचं आणि घरच्या वाटेला लागायचं. डोक्यावर तें तपेलं डचमळे अन् घरीं येईपर्यंत पुन्हा मला एकदा साग्रसंगीत आंघोळ घडे.त्या तपेल्यांतून एक तांब्या देवाच्या पूजेसाठीं भरून ठेवायचा असे अन् उरलेल्या पाण्याचं चुलीवर आधण चढवायचं असे.

मला पाणी आणावं लागतं याचं दुःख नसे. पण मी तशा स्थितींत घरीं

यायला लागलों कीं भागू नाहीं तर कावी गुरुजींच्या बायकोला हटकून म्हणायची, 'वेणाक्का, आली गे बाये तुझी सून.' मला दुःख होत असे तें या उद्गारांचं. त्या लवंग्या मिरच्यांचा मला रागही येई. चांगला पुरुषासारखा पुरुष असून त्यांनीं मला 'सून' या स्त्रीलिंगी नात्यानं उल्लेखावं म्हणजे काय! मी मनांत म्हणें, 'घरीं असतों तर दोन लगावल्या असत्या!'

दत्तूमामांची भस्मचर्चित संध्या आटोपली कीं जेवणाचीं पानं पुसून मांडायचीं हें माझं नेमलेलं काम. पण मी तरी काहीं कमी स्वार्थी नव्हतों. त्रिनफाटकी, हिरवीगार, सगळ्यांत चांगली आगोतली असेल ती माझ्या पाटापुढें मांडायची अन् बाकीचीं पानं मग यथाक्रम. दत्तूमामाच्या नजरेतून हा उघडा स्वार्थ सुटला असता तरच नवल! एक दिवस त्यानं मीं मांडलेलं पान उचलून बाजूला टाकलं अन् त्या जागीं अक्षरशः तीन हात लांब शिरती मांडली. 'भल्या, एवढं पुरेल ना मोठं पान?' असं मला विचारून लगेच त्यानं वेणाक्कालही फर्मावलं. 'अगे सुने, आज भल्याला या पानावर वाढायचं, बरं का!'

कोण माझ्या त्या फजितीचं वर्णन करूं शकेल! भाताचा ठाव पानाच्या मध्यभागीं होता त्यालाच माझा हात बसल्या जागेवरून पुरत नव्हता. मग टोंकाला असलेल्या मीठचटणीची गोष्टच कशाला? माझी आवडती कच्च्या केळ्यांची भाजीसुद्धां दूर-दूरच होती. मी या सगळ्या पदार्थांचा लोभ सोडला असता; पण दत्तूमामानें पहिल्याच दिवशीं मी पानांत टाकलेली कारल्याची चटणी, आंचवून आल्यावर पुन्हा मला त्याच पानावर बसवून खायला लावली होती. आणि त्याच वेळीं खणखणीत आवाजांत बजावलं होतं 'पानांत कांहीं टाकलेलं मला खपायचं नाहीं हं!' तो त्याचा घनगर्ज अजून माझ्या कानांत दुमदुमत होता आणि त्यामुळें आजही मला पानांत काहीं टाकणं शक्य नव्हतं.

मीं सगळ्यांच्या तोंडाकडे काकुळतीनं पाहिलं. गुरुजींच्या, वेणाक्काच्या अन् त्या आजीच्यासुद्धां. पण कोणीच माझ्या साह्याला आलं नाहीं. दत्तूमामाच्या हुकमांत ढवळाढवळ करणं म्हणजे त्यांचंहि मरण होतं. मी त्या भाजीच्या घांसासाठीं शक्य तितका ओणवलों. ताणतां येईल तेवढा हात ताणला, त्या प्रयत्नांत माझा पाट मागच्या बाजूनं उचलला गेला आणि अस्मादिकांची स्वारी सपशेल पानावर पालथी पडली ! त्या अन्नब्रह्माला तो माझा साष्टांग प्रणिपात होता. तो कढत भात पोटांत जाण्याऐवजीं माझ्या पोटाला चिकटला अन् मीठचटणीनं ओठाऐवजीं डोळ्यांशीं सोयरीक जोडली. माझ्या यातनांची कींव न करतां सगळीं माणसं मला हसलीं !

संध्याकाळपर्यंत ती गोष्ट पाण्यांतल्या तैलबिंदूसारखी वाडीभर पसरली. सगळ्या लहानथोरांनीं तोच प्रश्न पुन्हा पुन्हा मला विचारून माझी लाज काढली. फक्त इंदू तेवढी याला अपवाद होती. ती मला खोपीच्या आड भेटून म्हणाली.

" तूं मनाला लावून घेऊं नकोस. दत्तूमामा नाहीं तरी तसलाच आहे. मुलखाचा वाईट्ट ! "

तिच्या त्या स्निग्ध शब्दानीं माझे डोळे तरळले. तिला कुठें तरी एक कैरी मिळाली होती. आपल्या नेसलेल्या पंचाचा शेव वर करून तिनं ती त्यांत गुंडाळली, कचकूदिशीं चिमणीच्या दांताखालीं धरून फोडली अन् एक तुकडा माझ्या हातावर ठेवून आपल्या तोंडाला सुटलेलं पाणी गिळीत ती मागें वळून पहात पहात पसार झाली. मीं मनांतल्या मनांत म्हटलं, ' इंदू...इंदू !...'

कालसुद्धां ती अशीच माझ्यासाठीं झटली होती. संध्याकाळच्या वेळीं गुरुजींच्या सहा महिन्यांच्या हाडकुळ्या, लांब डोक्याच्या मुलीला खेळवण्याचा मक्ता माझ्याकडे असे. लहान मुलाला दुपट्याची गरज असते, निदान चड्डीची तरी, हें आमच्या वेणाक्काच्या गांवींही नव्हतं. ती जशा स्थितींत

जन्मली तशाच स्थितींत तिला उचलायची अन् थोपटीत थोपटीत मीं चालतं व्हायचं. ही कामागिरी मला एकाच कारणासाठीं पसंत असे. तिला घेऊन मला कुठंही फिरायची मोकळीक मिळे. तिच्या लाळेचा प्रसाद माझ्या खांद्याला नेहमीं मिळायचा; पण मी आतां त्याला सरावलों होतों.

पण काल त्या पोरटीनं कहरच केला. मी कढत कढत काय लागलं म्हणून पहातों तों माझ्या पोटावरून, डाव्या मांडीवरून झरे वहाताहेत ! हा प्रकार घडला तो तरी कोणी पहात नाहीं अशा जागीं का ? मुळींच नाहीं. इंदूच्या आंगणांत अन् सगळ्यांच्या साक्षीनें. भागू, कावी काय फिदीफिदी हंसल्या आहेत ! मला वाटलं, या कारटीला धडेवरून खालीं फेंकून द्यावं. पण तसं न करतां मीं तिला अंगणांत पालथी ठेविली. आणि आतां काय करावं, या विवंचनेंत तसाच घुटमळत राहिलों. पण तेवढ्यांत इंदू धावली. तिनं न्हाणीकडचा तांब्या पाटाच्या पाण्यानं भरून आणला आणि माझं पोट पाय वगैरे प्रक्षाळून काढलं. त्या पोरीच्या पोटाखालीं अंगणांतला दगडाविगड रुतला कीं, काय देव जाणे ! ती लागली ठणाणा करायला. तो तारस्वर पाटाखालीं आमच्या घरीं ऐकायला गेला. लगेच दत्तूमामाची साद दणाणली. ‘ भल्या ऽऽऽ ! ’ मीं तशीच त्या पोरीला उचलून खांद्यावर टाकली अन् ‘ ओ ऽ’ म्हणायला अर्ध्या वाटेंत पोंचलों. मी इंदूला म्हणणार होतों, ‘ तूं कित्ती चांगली आहेस ! अगदीं भांगराचा तुकडा ! ’ पण तेवढीसुद्धा त्या समंधाच्या सादेनं मला फुरसत दिली नाहीं.

दत्तूमामा मला ऊठपळ धारेवर धरीत नव्हता. पण एखादेवेळींच तो असा कांहीं खेकसे अन् डोळ्यांत आगोळ भरी, कीं तेवढ्यानंच माझ्या अर्ध्या रक्ताचं पाणी व्हावं. गुरुजी फक्त ‘ संथा घोकलीस का ? आवृत्ति म्हटलीस का ? ’ एवढीच मला टोंचणी लावायचे. मुलीला मीं खेळवलं, आंदुळलं कीं वेणाक्का माझ्यावर खूष असायची. फक्त मी ‘ शुभंकरोति ’ म्हटली तरी ती तिला ऐकूं जायची नाहीं अन् त्याबद्दल ती मला छेडायची.

गुरुजींची म्हातारी आई मला हात–बोट लावायची नाहीं. पण तसा आविर्भाव करून ‘ हाडरांडेच्या ’ ही पदवी मला वारंवार द्यायची. भागू, कावी यांनीं वेणाक्काजवळ माझ्या चुगल्या करायच्या अन् मला मारबीर बसला तर तो डोळेभर पहाण्यासाठीं अन् ‘ पुष्पांजळि ’ मिळाली तर ती कानभर ऐकण्यासाठीं त्या जरा वेळ तिथंच घुटमळायच्या. बाबलाच्या आईनं जातां येतां ‘ वेणाक्काची सून ’ म्हणून मला गौरवायचं— अन् बाबल ? पण त्याची कथा मला स्वतंत्र सांगितली पाहिजे.

तो मला केव्हां जवळ करील अन् केव्हां दूर करील याचा नेम नसे. मी त्याच्याबरोबर दुपारीं काजू गोळा करायला डोंगरावर जायचा, चवथ्या प्रहरीं गुरं घरीं आणायला माळावर जायचा अन् सायंकाळीं तुंब लावायला तळ्यावरही जायचा. अस्तमानीं तुंब लावला कीं, रात्रींत तें तळं तुडुंब भरे अन् सकाळीं बांबूनं ढोसून तो तुंब दूर केला कीं, पाटांत पाणी खळाळे. त्या वाडींतलं शीतल छायेचं समृद्ध कुळागर तें तळं पोशीत होतं. दुसऱ्या दिवशीं ज्याचं शिंपणं असेल त्यानें आदल्या रात्रीं तळं फुगवण्यासाठीं तुंब लावायचा. हें काम बहुधा मुलांच्याच वांट्याला यायचं. वाडीपासून तळं एक मैल दूर होतं. दोन टेकड्या एकत्र मिळून बनलेल्या खोऱ्यांत तें बांधलेलं होतं. सभोंवतीं दाट जंगल होतं. केगदीचीं अन् बोंडगीचीं कांटेरी बनं तळयांत अन् तळयाबाहेरही विस्तारलीं होतीं. उगमाकडे जाणारी पाटाची वाटही वृक्षांच्या राईतूनच जात होती. त्यामुळं वाडींतलं कोणतंही मूल एकट्यानं तळ्यावर जायला कचरायचं. आमचं शिंपणं असेल त्या पाळीला माझ्याबरोबर बाबल यायचा. अन् त्याच्या पाळीला मी त्याला सोबत करायचा.

आम्ही दोघे मिळून पाटांतून वर जायचे. वाटेंत आंब्याचं झाड दिसलं कीं, एखादं पडलेलं कच्चं पक्कं फळ मिळेल का, म्हणून त्याच्याखालच्या झिळीझिळकुट्यांतून भुईवर दृष्टि लावून फिरायचे. बाबलानं आंब्याएवढा दगड गुपचुप वर फेंकायचा अन् तो पडला कीं, आंबा म्हणून मी

धांवायचा आणि आंब्याऐवजीं दगड पाहून खट्टू व्हायचा. मला असं फसवण्यांत बाबलाला नेहमींच सुख वाटायचं. पुढें जातांना पेरूच्या झाडावर एखाद्या गुलाबी फळाला पोपटानें चोंच मारलेली दिसली कीं, बाबल त्या झाडावर वानरासारखा वळंघायचा अन् मी मान वर करून आशेनं खालीं उभा रहायचा. त्यानें माझ्या अंगावर टाकलेला पेरू डागळलेला, खाल्लेला, आहे हें पाहून मला बाबलाचा विलक्षण राग यायचा. पण उपयोग काय ? मला झाडावर चढतांही येत नव्हतं अन् बाबल अंगानं माझ्या दिढीचा असल्यामुळें त्याचं पारिपत्य करणंही माझ्या आवाक्यांत नव्हतं. कुठेही गेलं तरी ' देवो दुर्बलघातकः ! ' दुसरं काय...

त्या दिवशीं ऐन सूर्यास्ताला आम्ही तळयावर पोंचलों. तळयाचं वरचं पाणी निचरून गेलं होतं तरी जिथें तुंब होता त्या जागीं अजून दीड-दोन हात सांठलेलं होतंच. माझ्या तर तें कमरेइतकं झालं असतं. बाबल कशाला आंत उतरतो ! दुसऱ्या दिवशीं शिंपणं आमचं होतं ना ? तो बांधावर उभा राहिला अन् मला म्हणाला, ' उतर खालीं अन् लाव तुंब. '

अनन्यगातिक होऊन मी आंत उतरलों. माझे पाय पोटऱ्यांपर्यंत तळच्या चिखलांत रुतले. तें काळंनिळं पाणी माझ्या कमरेभोंवतीं विळखा घालून फिरूं लागलं. लंगोटी संपूर्ण भिजून गेली. मी ओणवा होऊन दोन्ही हात पाण्यांत घातले आणि जवळचं दारं तुंबाच्या तोंडांत ठांसून भरलं. तिथलाच चिखलाचा गोळा उचलून त्यावर थापला. आणि हलत नव्हता तरी तिथला चिरा दांतीं बळ धरून पुढें आणून तुंबाच्या तोंडावर घट्ट बसवला. एवढं होईतों पांच-दहा मिनिटं सहज लागलीं. नंतर मी कोंपरापर्यंत हात खळबळवले, पाय चिखलांतून काढून पंकप्रक्षालन केलं अन् वर आलों.

मला वाटलं होतं कीं, बाबल बांधावर असेल. पण तो तिथें नव्हता. मला एकट्याला या अटव्य रानांत सोडून हा मागच्या पावलीं पसार झाला

कीं काय, म्हणून मी दचकलों. तळयाचं पाणी सुटतांच एका मोठ्या काळ्या खडकावरून धबधब्यासारखं दोनतीन धारांनीं ज्या ठिकाणीं पाटांत पडत होतं, तिथं एक व्यक्ति उभी होती. ती बाबलाच्याच उंचीची आणि त्याच्याच-सारखी दिसत होती. पण तिला बाबल कसं म्हणायचं ? तो कोणी तरी वेगळाच होता ! माझी घरीं जाण्याची वाट तीच असल्यामुळें अन् दुसरा मार्ग नसल्यामुळें जीव मुठींत घेऊन मला तिथवर जाणंच भाग होतं. मी त्याला हटकणार नव्हतों, त्याच्या शेजारून अंग चोरून पुढें निसटणार होतों आणि घर भेटेपर्यंत जीव घेऊन नाकासमोर पळत सुटणार होतों. पण माझा तो पलायनाचा पवित्रा ओळखून बाबलानं दोन्ही भुजा पसरल्या आणि माझी वाट अडवली.

काय त्याचा तो अवतार ! जवळच्याच झुडपांचे चार टाळे मोडून त्यानं कमरेभोंवतीं करदोट्यांत खोंचले होते. पोफळीच्या पांढऱ्या शुभ्र गर्भपुटाच्या पिंजोळ्या गांठवून त्यांचं आणखी एक जाडजूड जानवं गळयांत घातलं होतं. आणि आपल्या लांबसडक शेंडीचे दोन भाग करून त्यानं तें दोन्ही कानांवरून पुढें आणले होते आणि वरच्या ओठावर नाकाखालीं त्यांची गांठ मारली होती. त्या कृत्रिम मिशांचे झुबके चिनी माणसासारखे त्याच्या जिवणीच्या कडेवरून खालीं गळ्यापर्यंत ओघळले होते.

तो बाबलच आहे हें मीं जवळून पाहिल्यावर नक्की ओळखलं. पण तरीहि त्याच्या अभिनव सोंगानं माझ्या तोंडचं पाणी पळालं. मी सुकल्या ओठावरून जीभ फिरवून कळवळ्यानें त्याला हांक मारली, 'बाबऽऽल !'

आणि त्यासरशीं छातीवर हात मारीत तो थयथय् नाचूं लागला. तो पाटांतच होता आणि पाटाला थोडंसं पाणी होतंच. त्यानं लाथ मारतांच त्या चिखलपाण्याच्या तांबड्या पिचकाऱ्या वर उडाल्या अन् तो नि मी दोघेही भिजून गेलों. प्रथम थोडा वेळ 'सूं सूं' श्वास घेऊन अन् मग आवाज बदलून तो मला म्हणाला.

" कोण बाबल ? मी ? मी बाबल ? नाहीं नाहीं. मी देवचार आहें. त्या फणसाखालच्या रोहिणींतला वाठारी आहें. या वाडींतला बाबल हा माझा लाडका आहे. त्याला तूं काल तुझ्यांतले काजूगर दिले नाहींस म्हणून मी तुझ्यावर कोपलों आहें. मी आतां तुझ्या मानगुटीवर बसणार आहें.... "

आणि तो पुन्हां सोसावूं लागला. पाण्यांत लाथा मारूं लागला. त्यानं आपली छाती पिटून लाल करून घेतली. मी तिथल्या तिथें गार झालों. माझं काळीज उपडं पडायची वेळ आली.

" बाबल...बाबऽऽल ! असं नकोरे करूं. मला भीति वाटते. तुला शपथ आहे. माझी, माझ्या गळ्याची, तुझ्या आईची...तूं देवचार नाहींस. तूं बाबलच आहेस. होय म्हण ना ! म्हण ना रे ! पायां पडतों तुझ्या– "

ती वेळच भुताखेतांची, राक्षसांची होती. त्या तळ्यांत आतां अंधार कालवूं लागला होता. वरचं रान सटसटूं लागलं होतं. खालचीं कुळागरं अधिक गंभीर होऊं लागलीं होतीं. आसपास कोणी माणूस नव्हतं. ज्या ठिकाणीं त्या तळ्यांतल्या पाण्याचा पहिला धबधबा पडत होता, तिथला तो खोलगट भाग काळमुखासारखा रौद्र, भीषण दिसत होता. वरच्या डोंगरावर कुठल्या तरी उंच झाडावरून घुबड आपला घूत्कार कांपवीत होतं. चिंवचिंवतीं पांखरं चिडीचिप झालीं होतीं. थोड्याच वेळांत आतां आसमंतावर काळा बोळा फिरविला जाणार होता. आणि या सगळ्या भयाणतेंतून ज्या सुहृदाच्या हातांत हात घालून मी पार पडणार होतों, तोच असा देवचार बनून माझ्यापुढें धुमसत, घुसळत राहिला होता.

अशा स्थितींत कुठवर मी तग धरावा ! कुणाच्या तोंडाकडे बघावं ! पण ज्याला कुणीच साह्यकर्ता नसतो त्याच्या साह्याला अश्रु धांवून येतातच. मी जेव्हां डोळे चोळून रडायच्या बेतांत आलों, तेव्हां मात्र बाबलानं माझा अधिक अंत पाहिला नाहीं. तो सदय होऊन मला म्हणाला, ' भ्यालास भलू ? '

त्यानं नाकाखालची शेंडीची गांठ सोडून आधीं मिशा दूर केल्या. तें उपरं जानवं नि कमरेंतले टाळे त्यानं फेंकून देतांच देवचाराचा अवतार संपला अन् माझ्या थोंत्र्याला खराखुरा बाबल आला.

" किती घाबरवलंस रे मला ? "

" हात्तिच्या ! त्यांत काय घाबरायचं ? मी एक देवचार बनलों तर तूं दुसरा देवचार बनायचंस. तुझ्या गांवांत नाहीं वाटतं देवचार ? "

त्यानं अगदीं माझ्या भयाचं वारंपाणी करून टाकलं. आम्हांला घरीं पोंचायला दिवेलागणी झाली.

त्यानंतर दोन दिवसांनीं दुपारीं माझी आजी एकदम प्रकट झाली. दुसऱ्या दिवशीं प्रतिपदेची सुट्टी होती अन् म्हणून ती मला न्यायला आली होती. खरं म्हणजे तिनं मला या खाईत आणून लोटल्याबद्दल मला तिचा राग आला होता. पण ' ये ना बाब्या ' म्हणून तिनं जेव्हां मला जवळ बोलावलं, तेव्हां तो राग कुठल्या कुठें पळाला अन् मी तिच्याजवळ जाऊन तिच्या गळ्याला मिठी घातली. मला अनावरपणें रडूं कोसळलं. मी त्या पंधरा दिवसांच्या परगृहवासांत गांजलों होतों. तेवढ्या त्या कालखंडांत मी अनेक अनुभव घेतले होते अन् ते बहुतेक सगळे कडू होते. प्रत्येक वेळीं माझ्या अंतर्यामाला एकेक जखम झाली होती. पण तिच्यावर फुंकर घालायला मात्र कोणी मायेचं जवळ नव्हतं. त्यामुळं माझं तें सारं सांचलेलं दुःख आजीचा हात पाठीवरून फिरतांच मोकळं झालं.

घरीं जाण्यासाठीं तिच्या मागून पाट ओलांडतांना मी मनाशीं वज्राचा निश्चय करीत होतों. ' पुन्हां या घराचं तोंड पहायचं नाहीं. अर्धे कापलं तरी परत यायचं नाहीं. खड्ड्यांत गेली ती विद्या ! ती भागू, ती कावी तो बाबल, ती अंगावर मुतणारी गुरुजींची मुलगी अन् तो तांबड्या डोळ्यांचा थरथरत्या मानेचा दत्तूमामा– कुण्णी मला दिसायला नको. '

पाटाच्या पुढें खोप लागली. तिला वळसा घालून मी तें गुरुगृह

डोळ्यांआड केलं. एवढ्यांत कुठून तरी उन्हांतून तांबडी लाल होऊन आलेली इंदू समोर दिसली. सांवळ्या रंगाची, बटमोगऱ्यासारख्या फुललेल्या नाकाची, हंसऱ्या डोळ्यांची, अन् माझ्याच उंचीची. मी आजीचं शेपूट होऊन जात असलेला पाहून तिनं आश्चर्याचा भाव दर्शविला. ढवळं स्मित ओठांवर खेळवीत तिनं मला म्हटलं.

"भलू, तूं चाललास? लवकर ये हं! कधीं येशील! उद्या? परवां? राहूं नको हं! मग एक जम्मत सांगीन तुला–"

आणि माझा एका क्षणापूर्वीं केलेला निर्धार डळमळला. त्या कांटेरी रानांत इंदू हें एकच एक माझ्या वांट्याला सुवासिक फूल होतं. दुःख हलकं करण्याचं एकमेव स्थान होतं.

---

# आश्वासन ८

मार्गशीर्षाचें प्रयाण आणि अनिरुद्धाचें आगमन या दोन्ही गोष्टी एकाच काळीं घडल्या. सह्याद्रीचा पारवडघाट उतरून प्रथमच त्यानें गोमंतकांत पाऊल ठेवलें होतें. मोरटेंब अन् चोरटेंब या दोन डोंगरांच्या मधल्या पट्टयांत जो एक लहान लहान गांवाचा पुंज होता, त्यांतल्या मधल्या गांवांत त्याला जायचें होतें. भेटेल त्याला वाट पुसत पुसत शिरटी गांवांतलें आपलें मुक्कामाचें घर त्यानें गांठलें होतें.

तो आल्याची वार्ता गांवांत पसरण्यास वेळ लागला नाहीं. त्याला पहाण्यासाठीं पहिली हजेरी लागली ती मुलांची. अनिरुद्ध हा खरा त्यांच्या औत्सुक्याचा विषय होता. येत्या संक्रांतीपासून ते ज्याच्या हाताखालीं शिकणार होते, तो त्यांचा मास्तर किती उंच आहे, किती ताकदवान् आहे अन् त्याच्या डोळयांत वाघाची ‘ घिस् घिस् ’ आहे का गायीची सौम्यता आहे तें त्यांना समजून घेणें अगत्याचें होतें. सगळयांनीं मुख्य गोष्ट पाहिली ती ही कीं, मास्तरच्या जवळपास एखादी छडी आहे कीं काय ?

अच्युत तर जितक्या उत्कंठेनें आला तितक्याच खुषीनें धांवत घरीं गेला.

“ आक्का ! आमचे मास्तर पाहून आलों. मला वाटलं होतं कीं असेल एखादा केस पिकलेला, दांत पडका शेजारच्या चंद्रुमामासारखा. पण हे तर अगदींच तरणे आहेत. तुझ्यासारखे तक्क गोरे नाहींत; पण दिसतात मोठे झोकदार. मला म्हणाले, ‘ तूं येणार आहेस का शाळेंत ? ’ मी म्हटलं ‘ हो. ’ मला फार आवडले. तूं पाहिलेस तर तुलासुद्धां आवडतील. ”

" काय वेडं पोरगं आहे ! म्हणे तुलासुद्धां आवडतील. मला कशाला आवडायला हवेत ! " रेवती स्वतःशींच पुटपुटली, आणि अच्युताला कुठल्या तरी कामाला पिटाळून आपल्या उद्योगाला लागली.

अनिरुद्धाच्या घरमालकानें शेजारच्या गांवीं विठोबा सावकाराला बोलावणें धाडलें. विठोबा त्या शिक्षणसंस्थेचा प्रमुख होता. त्याचा वर्गणीचा आंकडा जसा मोठा होता तसाच धाकहि मोठा होता. ती देवळाजवळची केंबळी छपराची शाळा बांधून घेण्यांत त्याचेंच द्रव्यबळ विशेष होतें. शाळा काढायची ती आजूबाजूच्या गांवांना मध्यवर्ती असलेल्या शिरटी गांवांत काढावी ही त्याचीच कल्पना होती. आणि त्याचें मुरटी गांव शिरटीला लागूनच ओढ्याच्या पलीकडे असल्यामुळें इतर मुलांची सोय होऊनहि त्याच्या मुलांची मुळींच गैरसोय नव्हती.

विठोबा सावकार आणि इतर गांवकरी अनिरुद्ध उतरला होता त्या घरीं जमा झाले. ' आमच्या पंचक्रोशींतले सरपंच ' म्हणून अनिरुद्धाला विठोबाची ओळख करून देण्यांत आली. अनिरुद्धानें सस्मित प्रणाम केला. पण विठोबाला आपले हात जुळवण्याची गरज वाटली नाहीं. आपल्यापेक्षां वयानें लहान असलेल्या व्यक्तीला आपण नमस्कार करायचा नाहीं; तर कृपावंत होऊन आशीर्वाद उच्चारायचा अशी त्याची धारणा होती. अनिरुद्धाला मात्र तें कसेंसेंच वाटलें. त्याच्या मनांत एक कटुभाव नकळत डोकावून गेला.

" काय, मास्तर ! नीटपणें शाळा चालवणार ना ! मागचा मास्तर एक दिवस अचानक पळून गेला तसं पुन्हां घडूं नये अशी अपेक्षा आहे आमची. "

खवचटपणानें बोलण्याची विठोबाची ती पद्धत अनिरुद्धाला अपमानकारक वाटली. पहिल्याच भेटींत, पहिल्याच वाक्यांत हा गृहस्थ आपल्याला चिमटा घेतो याचा अर्थ काय ? त्यानेंहि मग तितक्याच संभावितपणें उत्तर दिलें.

" जायचें झालें तर राजरोस निघून जाण्याइतकें धैर्य माझ्याजवळ आहे, असं आपण समजायला हरकत नाहीं. "

बसलेल्या मंडळीला अनिरुद्धाचें तें उत्तर मानवलें नाहीं. उत्तर योग्य; पण तें विठोबा सावकाराला देण्याजोगें नव्हे. कारण अनिरुद्धाला दरमहाचा पगार त्याच्याच हातून मिळायचा होता. विठोबाचा या भागांतला स्वयंसिद्ध अधिकार काय अन् त्याच्याशीं बोलण्यावागण्याची पद्धत कशी मर्यादशील असावी या बाबतींत या नवख्या मास्तराला कांहीं खास सूचना दिल्या पाहिजेत, हें त्याच्या घरमालकानें त्याचवेळीं मनाशीं ठरविलें. विठोबा डावा हात चाळवीत आणखी सांगूं लागला.

" बरं का मास्तर ! इथलीं मुलं आहेत व्रात्य. दिवसभर ' कोंडेबार ' ' आक्कोमाक्को ' ' राजाचं भात ' या खेळांशिवाय त्यांना दुसरं कांहीं सुचतच नाहीं. कशीं त्यांना तुम्ही वठणीवर आणतां पाहूं या. अभ्यास केला नाहीं कीं फोडून काढा एकेकाला—"

पण एवढें बोलल्यावर विठोबा एकदम घुटमळला. हा सरसकट उपदेश आपल्यालाच बाधेल असें त्याला वाटलें कीं काय कोण जाणे ! त्यानें मग त्याला पुस्ती जोडली.

" पण कोणाला चौदावं रत्न दाखवावं अन् कोणाला आंजारून गोंजारून त्याच्याकडून अभ्यास करून घ्यावा, हें सुद्धां समजलं पाहिजे बरं का ! ' तुरी मिरी सरोभरी ' असं होतां कामा नये. "

अनिरुद्ध कपाळावर येणाऱ्या आठ्या मोठ्या कष्टानें परतवून विठोबाचा उपदेश ऐकत होता. तो एस. टी. सी. झालेला होता. अध्यापनशास्त्राचें थोडेंबहुत ज्ञान त्याच्या पदरीं होतें. पण विठोबाच्या ' अनुभविक ' ज्ञानाशीं त्याचा मुळींच मेळ बसत नव्हता. तो मनांत म्हणत होता, ' हा गृहस्थ पैशाच्या बळावर बोलतो आहे; ज्ञानाच्या नव्हे. पण यावेळीं तरी मला तें ऐकून घेणं भाग आहे. मी जर असहकारितेच्या चळवळींत पडून तुरुंगांत

गेलों नसतों तर माझी बेळगांवच्या भारत हायस्कूलमधली नोकरी कां गेली असती अन् आपल्याला इकडे येण्याची तरी गरज कां भासली असती ? वडील दम्यानें आजारी असतात, त्यांच्या हातून आतां पूर्वीसारखी भिक्षुकी होत नाहीं, तेव्हां निदान शिकलेल्या मुलाचा तरी त्यांच्यावर भार पडूं नये म्हणून तर आपण या अनोळखी प्रांतांत हा नवा प्रयोग करायला निघालों आहों. नवी वाट काढायची तर विठोबासारखे ‘ दगड ’ भेटतील ते फोडले तरी पाहिजेत किंवा टाळले तरी पाहिजेत. तूर्त मात्र आपल्याला दुसरा पर्यायच स्वीकारायला हवा. उगाच ‘ प्रथमग्रासे मक्षिकापातः ’ नको.

विठोबा सावकाराची ठेंगणी, गालफुगरी मूर्ति उठून जाल्या मार्गाला लागली तेव्हां अनिरुद्धाला हायसें वाटलें खरें; पण तिनें जेव्हां तिथून रेवतीचें घर गांठलें तेव्हां तिचा जीव मात्र खालीं वर होऊं लागला. विठोबा म्हणजे रेवतीच्या घराला लागलेलें ग्रहण होतें. आणि त्याला अवसे–पुनवेचेंहि बंधन नव्हतें. रेवतीचा बाप मरून गेला होता अन् आई आपली होती ‘ धतर मतर. ’ विठोबाची बायको चार मुलांना मागें ठेवून परलोकाची प्रवासिनी झाल्यापासून येसूआक्का विठोबाच्याच घरची झाली होती. वेळीं अवेळीं त्यानें निरोप धाडावा, तिनें जावें, स्वैंपाकपाणी करावें, त्याच्या लेंढाराच्या खस्ता खाव्या अन् रात्रीं जळल्या कोलिताच्या प्रकाशांत आंग टाकायला घरीं यावें. कित्येकदां तर ती चार चार दिवस तिकडेच रहायची अन मग घरांतलें सगळें करून अच्युतासह घर संभाळणें ही जबाबदारी रेवतीच्या माथीं यायची. रेवतीच्या बापाची जी थोडीशी वतनवाडी होती, तिचा कारभार विठोबाच पाही. त्यांच्या ओढघस्त संसाराला विठोबाचा बराच आधार होता. आणि याच उपकाराच्या जोरावर अलीकडे रेवती-विषयीं तो निराळाच विचार करूं लागला होता. त्या घरीं येऊन तो तासन् तास बसे आणि मऊ मिठ्ठास बोले तो रेवतीच्या विकसनशील हृदयांत आपली प्रतिमा विराजित करण्यासाठीं. त्या धूर्त पोरीनें विठोबाचे हे पोटांतले

पाय केव्हांच ओळखले होते. आणि म्हणूनच विठोबा दिसला कीं तिच्या चंद्रखंडासारख्या कपाळावरची शीर उठे.

“ काय अच्युत ! शाळेला जाणार कीं नाहीं ! नवा मास्तर आला आहे.” चौफाळ्यावर बसतां बसतां त्यानें विचारलें.

“ मी दुपारींच पाहून आलों मास्तरांना. मला फार आवडले. ” अच्युत बांबूची काडी तासीत होता तिथूनच उत्तरला.

“ आवडायचं काय त्यांत ? तो काय मान्कुराद आंबा आहे का मोगऱ्या फणस आहे ! हे घाटवळ लोक म्हणजे ‘ छप्पनठिगळी ’ असायचे. मागचा एक गेलाच पळून. याची तरी शाश्वती काय ? टिकल तेव्हां खरा. ” पुढचीं दोन तीन वाक्यें त्यानें रेवतीला लक्ष्य करून उच्चारलीं होती.

अच्युताची आळवणी अन् विठोबाची नाकमुरडणी या विरोधांतूनच अनिरुद्धाला पहाण्याची इच्छा रेवतीच्या मनांत प्रबल झाली. कसलें तरी निमित्त काढून ती संध्याकाळीं अनिरुद्ध उतरला होता त्या घरीं गेली. पण अनिरुद्ध त्याच वेळीं पाय मोकळे करायला बाहेर पडला होता. तिला दर्शन झालें तें एका जाडजूड पिशवीचें आणि तिच्या शेजारच्या दोन जाड्या ग्रंथांचें. उत्कंठेचा उपशम न झाल्यामुळें रात्रीं झोंप लागेपर्यंत तिचें मन, न पाहिलेल्या अनिरुद्धाभोंवतीं घोटाळत राहिलें. ते ग्रंथ पेलणारे त्याचे हात कसे असतील ? ते वाचणारे डोळे किती तरल असतील ?

त्याचवेळीं अनिरुद्धाच्या चिंतनांत विठोबा प्रविष्ट झाला होता. दुपारचें विठोबाचें वर्तन अनिरुद्धाला संस्कारीपणाचें वाटलें नव्हतें. या माणसाशीं आतां आपला हरघडी संबंध येणार या कल्पनेनें त्याच्या मनांत नाखुषी निर्माण केली होती. दुसऱ्या दिवशीं गांवांतल्या पुष्कळशा घरीं त्यानें पायधूळ झाडली. पुष्कळांच्या ओळखी करून घेतल्या. तो जिथें जिथें गेला तिथें तिथें त्याचें सादर स्वागत झालें. सगळीं माणसें त्याच्याशीं हळमळीतपणें बोललीं. पण त्यांच्या संभाषणांत त्याला आढळून आलें कीं, या माणसांचें जग अगदींच

चिमुकलें आहे. हीं माणसें निराळ्या अर्थानें मुलेंच आहेत. आणि इथें आपल्या ‘ जातीचें ’ कोणी नाहीं.

संध्याकाळीं देवळाच्या बाजूला जाऊन तो एका धोंडीवर बसला. त्याच्या समोर सौम्यसुंदर सूर्य डोंगराखालीं उतरत होता. ‘ हा काश्यपगोत्री सविता दिनकृत्य संपवून आपल्या घरीं चालला आहे. माझंहि गोत्र काश्यपच; पण माझं घर किती दूर राहिलं ! घरच कशाला, सगळ्या जगापासूनच मी अलग झालों आहे. या दोन डोंगरांच्या तटबंदींत कोंडून घेण्यासाठीं मी होऊन खालीं उतरलों आहे. कसला प्रयोग आरंभला आहे मी हा ! यांतून कांहीं निष्पन्न होणार आहे का ?.........’

एवढ्यांत अच्युत अन् रेवती ही जोडी आपल्या बाजूला येत असलेली त्याला दिसली. रेवतीच्या डोक्यावर वेलपालवीचें ओझें होतें अन् अच्युताच्या हातांत काल तो बांबूची काठी ताशीत होता तिची डेलकी होती. अच्युताला त्यानें ओळखलें; पण ती कोण हें त्याला समजलें नाहीं. वेलींचीं कांहीं अग्रें तिच्या तोंडावर आलीं होतीं आणि त्यामुळें तिचें मुखमंडल सुव्यक्त दिसत नव्हतें. तिची तुरुतुरु चाल तेवढी त्याच्या डोळ्यांत भरली. जवळ जवळच पण किती द्रुतगतीनें तिचीं पावलें पडत होतीं ! तें ओझें त्या कोमलांगीच्या खिसगणतींत नसावें बहुधा.

“ घरीं येतां मास्तर ? ” अच्युतानें क्षणभर थांबून आदराच्या स्वरांत विचारलें.

“ नाहीं रे ! बसतों थोडा वेळ. ”

“ मास्तर, मग अंधार पडेल कीं. या बाजूला जीवाजिवाणूं फार असतात. ”

“ बरं तर, येतों चल. ”

अनिरुद्ध उठला. त्यानें बसायला घातलेला रुमाल झटकून खिशांत घातला. हातांतल्या घड्याळावर एक नजर टाकली आणि तो अच्युताच्या मागून

निघाला. त्याच्या त्या दोनच वाक्यांत अनिरुद्धाला स्नेहाळ सौजन्याची छटा दिसली, तेवढ्यानेंच तो प्रसन्न झाला. आपण कांहीं अगदींच रानांत पडलों नाहीं, असें त्याला वाटलें. अच्युताच्या लंगोटीचें टोंक पाठीमागच्या बाजूनें लांब सुटलें होतें अन् त्याच्या प्रत्येक पदन्यासाबरोबर गोंड्यासारखें हालत होतें, त्याची त्याला गंमत वाटली. मध्येंच तो अनिरुद्धाकडे वळला अन् म्हणाला,

" ही माझी अक्का, मास्तर ! पाला आणायला गेलों होतों आम्ही. घरांत लहान वासरूं आहे ना ! "

अच्युतानें आपला उल्लेख केलेला ऐकून रेवतीच्या उरांत धक्‌धक् सुरू झाली. अनिरुद्ध मनांत म्हणाला, ' तिला मी दिसूं शकतों; पण मला मात्र तिचें मुख पहातां येत नाहीं. उत्तररामचरितांत भवभूतीनें हीच गंमत केली आहे. सीतेला रामाचें दर्शन होतें; पण रामाला मात्र सीता दिसत नाहीं. '

चार दिवसांनीं संक्रांत आली आणि त्या मुहूर्तावर शाळेचें पुनरुज्जीवन झालें. त्या दिवशींहि विठोबानें आपला शिष्टपणा दाखविलाच. प्रमुख गांव-कऱ्यांना घेऊन तो मुहूर्ताला आला आणि मास्तरांच्यासाठीं असलेल्या एकु-लत्या खुर्चीवर स्वतःच आसनस्थ झाला. अनिरुद्धाला त्या मोडकळीस आलेल्या मेजाचा कोपरा धरून उभें रहावें लागलें. तेवढ्यांत त्यानें औट घटकेचें राज्य गाजवून घेतलें. आपल्या डाव्या हाताची तर्जनी रोखून त्यानें समोर बसलेल्या अनेक मुलांना वाक्‌ताडन केलें. ' ए वाश्या, बाहेर काय बघतोस ? नीट पुस्तकाकडे पहा...ए गण्या, अन् तो पलीकडचा कोण ? चावटपणा काय लावला आहे ? तुमच्या मानेवर खडाच ठेवायला हवा. आमच्या नानाची देख ध्या थोडीशी. तो कसा देवासारखा आहे पहा...'

हें सरळ सरळ अनिरुद्धाच्या अधिकारावर अतिक्रमण होतें. खरमरीत शब्दांनीं विठोबाला तिथल्या तिथें सोलून काढावा अशा त्याला आंतून

ऊर्मी येत होत्या. पण मुलांच्या देखत फार्स नको म्हणून त्यानें मन आवरलें. विठोबाची पाठ वळतांच मुलांनीं जी त्याची अन् त्याच्या नानाची ' षष्ठी ' केली ती मात्र त्याला लवकर आवरतां आली नाहीं.

बऱ्याचशा मुलांनीं पहिल्याच दिवशीं त्याला आपलेसें 'केलें. अनिरुद्ध त्यांच्या संगतींत रमूं लागला. बेळगांवकडच्या त्याच वयाच्या मुलांपेक्षां तीं मुलें सामान्य ज्ञानाच्या दृष्टीनें बरींच खालीं होतीं; पण गुरूविषयींचा त्यांचा आदरभाव कितीतरी पटींनीं अधिक होता. अनिरुद्धाचा शब्द त्यांना वेद-वाक्यासारखा वाटे. त्यामुळें अनिरुद्धाला त्यांच्याविषयीं अलिप्तपणा ठेवतां आला नाहीं. तो सर्वभावें त्यांचा झाला.

पहिल्या महिन्याचा पगार हातीं येतांच त्यानें सांखळीला जाऊन कांहीं गरजेच्या वस्तू खरेदी केल्या आणि आपलें बिऱ्हाड शाळेजवळच्या खोलींत हालवलें. तो आतां स्वतः करून जेवणार होता. हवीं असलेलीं भांडींकुंडीं शेजाऱ्यांनीं आपण होऊन त्याला दिलीं होतीं. संध्याकाळीं शाळा सुटली कीं घरीं जाण्यापूर्वी अच्युत मास्तरांच्या खोलींत शिरून चुलीपर्यंत डोकावून येई. अन् घरीं गेल्यावर आई असली तर तिला, नाहींतर रेवतीला म्हणे. ' आक्का गो ! मास्तरांच्या चुलीवर एका बगुण्यांत फक्त आंब्याएवढा दुपारचा भात आहे. अन् कालवायला कांहींसुद्धां नाहीं. कशाशीं गो जेव-तील ते ? ' त्या प्रश्नांतला गर्भितार्थ रेवती ओळखी अन् मग त्याच्या हातीं कांहींतरी ओलवण धाडून देई.

एका सुट्टीच्या दिवशीं दुपारीं अनिरुद्ध देवळासमोरच्या पिंपळावर वाचीत बसला होता. एवढ्यांत अच्युत तिथें आला. त्यानें आधीं पिंपळाला अन् मग अनिरुद्धाला नमस्कार करून म्हटलें,

" आमच्याकडे येऊन जातां का मास्तर ? "

" कशाला रे ? "

" आईनं तवश्याचे पातोळे केले आहेत. आक्का म्हणाली, जा तुझ्या मास्तरांना बोलावून आण. "

" म्हणजे आक्कासाठीं बोलावतो आहेस तूं. तुझ्यासाठीं नाहीं कांहीं. " अनिरुद्ध हंसून म्हणाला.

" असं कसं मास्तर ? आक्का अन् मी काय दोन आहोंत ? "

अच्युताचें तें उत्तर पातोळ्यांपेक्षांहि त्याला आस्वाद्य वाटलें. आणि मग त्याच्या मागून जात असतां अच्युताचें तें उड्या मारीत चालणें, कुंभ्याच्या पानाची वळकटी मध्यें पिंजून त्याची जोड नळी तयार करणें, चरावरच्या आड्यांवरून जातांना पावलाला पाऊल लावून चालणें, या त्याच्या बाल-क्रीडा अनिरुद्धाला उमद्या आणि सफाईदार वाटल्या.

अनिरुद्ध चौफाळ्यावर बसलेला पाहतांच एका फाळक्यावर दोन पातोळे आणि त्यांवर गाईचें पिवळसर रवाळ तूप असा सरंजाम दारांतून पुढें झाला. ' अच्युत, हें दे. '

" वाः आक्का ! तूंच देस कीं. मास्तर काय परके आहेत होय ? "

अनिरुद्धानें त्या दिवशीं कातरवेळेला जी पाहिली होती तीच चपलचरणा त्याच चालींत पुढें आली. त्यावेळीं अर्धवट झांकून राहिलेला तिचा मुख-चंद्र अनिरुद्धाच्या दैवानें त्याला आज सकल–संपूर्ण दिसली. पण त्याचें चांदणें आलें आलें तोंच दाराआड अदृश्य झालें, त्याची त्याला चुटपुट लागून राहिली.

" मास्तर, आमच्या आक्काचं एक सांगूं का तुम्हाला ? मी शाळेंतनं आलों रे आलों कीं ही मला म्हणते, आज मास्तरनीं कोणता धडा शिक-वला ? मी नांव सांगितलं कीं मग तो र ट फ वाचीत बसते. अन् मग सुरू होतं, या शब्दाचा अर्थ काय अन् त्या वाक्याचा अर्थ काय ? एक दिवस तिला मी म्हटलं, अगो, मला काय विचारतेस ? मास्तरांनाच जाऊन विचार कीं. तर आक्कानं तेंच पुस्तक माझ्या पाठींत घातलं......"

अच्युत आपल्या आक्काच्या कागाळ्या आणखी किती सांगत राहिला असता कोण जाणे ! पण एवढ्यांत ' अच्यु ऽ ऽ त ' अशी आंतून दटा-वणी आली अन् मग त्याला जीभ आवरावी लागली.

अनिरुद्ध जायला निघाला तेव्हां अच्युत त्याला चार पावलें पोंचवायला गेला. त्याला आक्काच्या परोक्ष मास्तरांशीं कांहीं कानगोष्टी करायच्या होत्या म्हणून त्यानें पुढें होऊन मास्तरांची वाट अडवली.

" तुम्हाला एक विचारूं मास्तर ? "

" काय ? "

" तुम्ही माझ्या आक्काला शिकवाल ? तिला फार आवड आहे शिकायची. ती काय म्हणते ठाऊक आहे ? तुझे मास्तर केवढालीं पुस्तकं वाचतात ! त्यांना जगांतलं सगळं सगळं कळत असेल, नाहीं रे ? तूं सुद्धा थोड्या दिवसांनीं खूप खूप शहाणा होशील. मला मात्र कां ऽ ऽ ही येणार नाहीं. " हें बोलतांना अच्युताच्या डोळ्यांत कसल्या तरी आर्ततेची झाक उमटली होती अन् त्याचा वाटोळा चेहरा अधिकच मोहक दिसत होता. अनिरुद्धानें सहानुभूतीनें त्याला म्हटलें.

" आपण विचार करूं या गोष्टीचा हं. सांग तुझ्या आक्काला. "

अनिरुद्धाला तो दिवस मोठ्या सुखाचा गेला. त्या दिवशीं सूर्य डोंगरामागें उतरतांना त्याचें मन विषण्ण झालें नाहीं. ' कोण आहे आपलं या गांवांत ! ' हें नैराश्य त्याचें आज मावळलें होतें. अच्युत तर उघड उघड त्याचा झाला होता. अन् त्याची आक्का ? तिनेंसुद्धां जाळीदार आवरणांतून जो जिव्हाळा दाखवला होता तो काय कमी हृद्य होता ?

अनिरुद्ध आस्थेनें शाळेंत काम करूं लागला. त्या ओबड धोबड मडक्यांना आकार आणूं लागला. त्यांचीं शरीरेंच नव्हेत; तर मनेंहि घडवूं लागला. त्यानें प्रथम मुलांची चौकस वृत्ति वाढवली अन् मग तो तिला खाद्य पुरवूं लागला. रोज नवे नवे विषय अन् नव्या नव्या गोष्टी घरच्या माणसांच्या कानांवर पडूं लागल्या. त्या दोन डोंगरांपलीकडच्या अफाट जगाची अंधुकशी कल्पना त्या कूपमंडूकांना येऊं लागली. ' मागचा मास्तर

अन् हा मास्तर यांच्यांत बारा गांवच अंतर ' असे उद्गार गांवकऱ्यांच्या तोंडून निघूं लागले.

विठोबा मात्र आपल्या घरीं बसून कुंसें मोडीत होता. शाळेच्या वेळांत मास्तर मुलांना गोष्टी सांगतो याबद्दल त्याची तक्रार होती. मुलें तासभर वेगवेगळे खेळ खेळतात हा त्याला कालापव्यय वाटे. आणि मास्तर स्वतः काचा घालून मुलांबरोबर खोखो, हुतूतू खेळतो ही तर त्याच्या मतें पोरकट-पणाची पराकाष्ठा होती. एकदां तर त्यानें चंद्रमामाच्या बरोबर अनि-रुद्धाला निरोपच सांगून पाठवला होता. ' मास्तराला म्हणावं, आम्ही तुला पगार मोजतों तो खेळण्यासाठीं अन् काण्या सांगण्यासाठीं नव्हे. आमच्या मुलांना चार अक्षरं आलीं पाहिजेत. '

पण अनिरुद्ध हे विठोबाचे आडून आलेले वाग्बाण अंगाला लावून घेत नव्हता. तो म्हणे, समक्ष तोंड काढील तेव्हां पाहून घेऊं. याशिवाय अलीकडे तो एक बिनपगारी शिकवणी करूं लागला होता. रेवतीचें घर वरच्या टोंकाला असल्यामुळें तिच्या दारांत पाटाचें पाणी नेहमींच स्वच्छ अन् खळाळतें असे. अनिरुद्ध रोज स्नानासाठीं त्या देवण्यावर जाई अन् थोडावेळ रेवती अन् अच्युत यांना शिकवून घरीं परते.

त्या दिवशीं असाच पाठ चालला होता. एकेका वाक्याचा अर्थ उकलून सांगतांना अनिरुद्धाची रसवंती ' मधुकुल्या ' झाली होती. रेवतीच्या साऱ्या चित्तवृत्ति श्रवणमय झाल्या होत्या. तिचे कान प्रतिपाद्य विषय पीत होते अन् डोळे त्याचें उत्फुल्ल रूप प्राशीत होते. तिच्या दारीं जणूं मोगरा फुलला होता. त्या दोघांच्या हृदयांतून एकाच जातीचा भावप्रवाह उसळत होता आणि अच्युत त्यावरचा रुपेरी तरंग बनून कधीं इकडे तर कधीं तिकडे असा झुलत राहिला होता. त्यावेळीं तीं तिघेंहि जणूं पृथ्वीचा संपर्क तोडून अंतराळांत तरंगत होतीं.

आणि नेमका याचवेळीं विठोबा सावकार तिथें उपटला. पायरीवर येऊन

उभा राहीपर्यंत त्याच्या आगमनाची कोणाला चाहूल लागली नाहीं. पहिल्यांदा जाणीव झाली ती अच्युताला. त्यानें हळूंच रेवतीच्या हाताला चिमटा घेतला. त्याच्यावर दृष्टी गेली मात्र; तिच्या डोळ्यांतलें मार्दव नाहींसें झालें. अनिरुद्धाचीहि सरस्वती आटली. मांडलेला रस एकदम वितुळला. आपल्या फुगीर गालांवरचे बारीक डोळे आधीं आंत पळणाऱ्या रेवतीवर, मग अनिरुद्धाच्या मुद्रेवर रोखीत आणि डावा हात पुढें नाचवीत चौफळ्यावर येऊन बसतां बसतां त्यानें म्हटलें.

" काय, मास्तर ! अच्युतवर भारी प्रेम दिसतं तुमचं. शाळेंत तर त्याला शिकवतांच अन् शिवाय घरीं येऊन. "

" प्रेम देईल त्याला प्रेम मिळतं. जगाचा न्याय आहे हा. "

अनिरुद्धानें एक अर्थगर्भ टोला लगावून आंघोळीला जाण्यासाठीं तांब्या उचलला. विठोबा तेथें किती वेळ बसतो अन् काय करतो याविषयीं त्याला कांहीं कर्तव्य नव्हतेंच. पण संध्याकाळीं शाळेंत अच्युताचा कष्टी चेहरा पाहून मात्र त्याला अस्वस्थता वाटली. अच्युत हा अनिरुद्धाला चंद्रासारखा झाला होता. त्याच्या उत्साहाला भरती यायची तर अच्युत प्रफुल्ल असावा लागे. शाळा सुटल्यावर त्यानें त्याला खोलींत बोलावून दुर्मुखण्याचें कारण विचारलें. बराच वेळ तो तोंडानें न बोलता डोळ्यांनींच बोलत होता. अनिरुद्धाच्या सहानुभूतीचा ओलावा जेव्हां मिळाला तेव्हां त्यानें आपल्या मर्मावरचा घाव उघडून दाखवला.

" काल तुम्हीं निघून गेलांत अन् विठोबा आक्काला खूप रागावला. नाहीं नाहीं तें बोलला मास्तर ! म्हणे ' खबरदार त्याच्याशीं लघळपणा केलास तर. मोठी बालिष्टरीणच होणार आहेस कीं नाहींस शिकून. ' आक्का शिकली म्हणून याच्या बापाचं काय घोडं मेलं हो ? "

" अं हं ! असले अपशब्द बोलूं नयेत. "

" नाहीं मास्तर ! पण मी त्याच्यावर दया मात्र केल्यावांचून रहाणार नाहीं. "

" दया ? "

" हो, दया ! तो शेताजवळच्या पाळंदींतून वर येऊं लागला कीं धडे-वरच्या अननशीच्या आड राहून असा एक दगड झोकीन कीं खोकच पडली पाहिजे डोक्याला. "

अच्युताच्या या विसंगत बोलण्याचें अनिरुद्धाला हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाला.

" अजबच आहे रे तुझी दया ! "

" मग त्या दिवशीं तुम्हीच नाहीं कां सांगितलंत ?

" दया तिचें नांव भूतांचें पाळण
आणिक निर्दळण कंटकांचें "

अच्युताला त्या दयेपासून परावृत्त करायला अनिरुद्धाला मग निराळीं कांहीं वचनें सांगावीं लागलीं. तो गेल्यावर अनिरुद्ध कितीतरी वेळ विचारांत बुडून राहिला. ' रेवतीला जर विठोबाकडून अशीच पुष्पांजुळि नेहमीं मिळणार असेल तर तिच्याकडे जाणें योग्य कीं अयोग्य ? ' त्याचा या बाबतींतला निर्णय पक्का होण्याच्या आंतच विठोबाचा भेटून जाण्याबद्दल त्याला निरोप आला. अनिरुद्ध गेला नाहीं तेव्हां दुसऱ्या दिवशीं विठोबाच त्याच्या खोलीवर दाखल झाला. ' अच्युताच्या घरीं तुम्ही ' ऊठ पळ ' गेलेलं मला खपणार नाहीं. ' त्यानें अनिरुद्धाला बजावलें.

" कोणाकडे जावं अन् कोणाकडे जाऊं नये हा माझ्या मर्जीचा प्रश्न आहे. " अनिरुद्धहि तितकेंच रोखठोक बोलला.

" पण तुम्ही आमच्या गांवांत आलां आहां. पोटार्थी म्हणून आलां आहां. नोकरी संभाळायची असेल तर तुम्हाला माझ्याच तंत्रानं चालावं लागेल. "

" तुमच्या तंत्रानं चालायला तुम्ही मला विकत घेतलं नाहीं, समजलं ? "

" लहान तोंडीं मोठा घास घेऊं नका मास्तर—"

" हुंः ! "

विठोबा लालबुंद होऊन पाय आपटीतच तिथून गेला. या मास्तराला इथून निखळवायचा हें त्यानें जातांनाच ठरवून टाकलें. मास्तराचें वर्तन स्वच्छ नाहीं, तो गांवांतल्या मुलींकडे वांकड्या डोळ्यांनीं पहातो, हा पोरांना बिघडवील, असा घरीं बसूनच त्यानें सर्वत्र प्रचार केला आणि मग एका रविवारीं ग्रामस्थांची सभा बोलावली.

अनिरुद्धाला हें सगळें मुलांच्या तोंडूनच कळलें. आपल्याला ही शाळा सोडून जावें लागणार हें त्याला समजून चुकलें. विठोबानें तसा ठराव आणल्यावर त्याला विरोध करण्याची कोणाहि ग्रामस्थ माणसाची प्राज्ञा नाहीं हें तो पुरतें जाणून होता. रविवारीं सभा तर शनिवारीं सकाळींच त्यानें मुलांचा निरोप घेतल्यासारखें केलें. त्याची जाण्याची भाषा ऐकून मुलांनीं नाक डोळे लाल केले. त्याचाहि गळा दाटल्यावांचून राहिला नाहीं. त्या मुलांसाठीं त्याचा जीव तुटत होता. त्या गांवाबद्दलहि त्याला ओढ निर्माण झाली होती.

दुसऱ्या दिवशीं उगवत्या सूर्याच्या किरणांबरोबरच अच्युत त्याच्या खोलींत दाखल झाला. तोंड धुवून आला होता तरी त्याची बालमुद्रा उमलली नव्हती. बैठकीवर न बसतां तो उभा राहिलेला पाहून अनिरुद्ध त्याला म्हणाला.

" काय हवंय् तुला ? "

" मला कांहीं नकोय् मास्तर ! "

" माझ्या ताटांतला हा लाहीपिठाचा लाडूसुद्धा ? बरं बाबा. राहिलं आमचं. "

" आक्का काल रात्रीं रडत होती मास्तर ! अगदीं हुंदके देऊन देऊन रडत होती. जरा थांबायची, अन् पुन्हां हमसायची. मी जवळच झोपलों

होतों म्हणून मला कळलं. मी तिच्या गालांवरचे ओघळ माझ्या बोटांनीं पुसूं लागलों तर तिनं माझा हात आपल्या तोंडावर घट्ट दाबून धरलान्. थोड्या वेळानें माझ्या कपाळावरून हात फिरवीत मला म्हणाली.

" अच्युत ! "

" काय आक्का ? "

" तूं सुद्धां असाच जाशील ना एखादे दिवशीं मला सोडून ? तुम्ही पुरुष मोठे निष्ठुर असतां रे ! सहजासहजीं जीव लावतां अन् तितक्याच सहजपणें सगळं विसरून चालते होतां. "

" आक्का, तूं काय म्हणतेस ? मला कांहींच कळलं नाहीं. "

" तुलाच कशाला ? कोणालाच कळायचं नाहीं तें. तें फक्त माझ्याच काळजांत उरायचं अन् तिथेंच जळत रहायचं. "

एवढं सांगून अच्युत थांबला. आपल्या वाटोळया तोंडावरचे वाटोळे डोळे त्यानें अनिरुद्धाच्या दृष्टीवर स्थिर केले. जो अर्थ अच्युताला समजला नव्हता तो अनिरुद्धाला एका क्षणांत समजून तोहि निळ्या डोहासारखा गंभीर झाला. त्या शब्दांनीं रेवतीची भावनाच नव्हे; तर तिची आर्ततासुद्धां उघड झाली होती. अनिरुद्ध असा हतबुद्ध झाला असतां त्या बालब्रह्मानें आणखी एकदा त्याला आळवलें.

" मास्तर, तुम्हीं आमच्या आक्काशीं लग्न कराल ? " आणि अनिरुद्धाचे डोळे एकदम फुलले.

" कां रे ? "

" तो विठोबा सावकार म्हणे तिच्याशीं लग्न करणार आहे. आक्काला तो मुळींच आवडत नाहीं अन् मला पण—तो कवाडीच्या आंत शिरला कीं

आक्का म्हणते, ‘आला शनि मला साडेसाती करायला.’ त्याच्या आधीं तुम्हीच आक्काला घेऊन चला. म्हणजे बसूं दे त्याला चणे खात.”

अच्युताला त्यानें थातुर मातुर करून परत पाठवलें खरें; पण तो मात्र पुरता बेचैन झाला. संध्याकाळीं सभेची वेळ होईपर्यंत त्याला संकल्प-विकल्पांचें द्वंद्व सहन करावें लागलें. थोडा वेळ रेवती त्याच्या मनाचा कबजा घेई, थोडा वेळ तो विठोबा त्याच्यावर डोळ्यांतली आग पाखडी. कधीं तीं दोघें बोहल्यावर समोरासमोर उभीं आहेत असेंहि दृश्य प्रगटे आणि त्याच्या जिवाची लाही होई. मग मन त्याचा उपहास करून म्हणे, ‘कशाला दांत-ओठ खातोस? सगळ्या विश्वसंसारांत हेंच चाललं आहे. जगांतले किती अत्याचार तूं मोडून काढूं शकशील! तुझी ताकद ती काय!’ पण मनाचा हा तडतडाट थांबतो न थांबतो तोंच आंत कुठेंतरी सतारीसारखा मृदु मधुर नाद उमटे—‘रेवती, माझी रेवती!’

सभेची वेळ झाली होती. शाळेजवळचें देऊळ हें सभास्थान होतें. लोक हळू हळू जमूं लागले होते. कोणी बाराबंदी–रुमालवाले, कोणी नुसताच पंचा खांद्यावर टाकलेले उघड्या अंगाचे, कोणी मुंडेछाट: सदऱ्यावर काळ्या टोपीचे, कोणी चरचर वाजणाऱ्या वहाणांचे तर कोणी अनवाणी पायांचे. आणि सर्वांच्या पाठीमागून चार दोन होयबांसहित ती विठोबाची स्वारी. डावा हात नाचवीत अन् सगळीकडे काकदृष्टि फेंकीत.

सभेच्या कामाला प्रारंभ झाला हें अनिरुद्धाला शाळेच्या पायरीवर बसला होता तिथूनच समजलें. अर्थात् त्याला बोलावणें नव्हतेंच. विठोबाचा ठराव पुढें आला. होयबांनीं त्याला पाठिंबा दिला. मधूनच एक दोन विरोधी सूर उमटले; पण विठोबानें ते तितक्याच तिखट शब्दांत दडपून टाकले. ‘शाळा बंद राहिली तर मुलं उनाड होतील, शिकलेलं सगळं विसर-तील’ असा आणखी एक मवाळसा प्रतिवाद उठला. त्यावर विठोबाची

वाणी ठणकली. ' मी त्या तजविजींत आहे. कांहीं झालं तरी असल्या उर्मट अन् संशयास्पद माणसाच्या हातांत मुलं राहूं देणं धोक्याचं आहे. ' आणि मग तो ठराव ' सर्वानुमतें ' मान्य झाला. त्याच वेळीं सभाजनांपैकीं कित्येकांचे आत्मे मूकपणें हळहळले.

सभेचें काम संपलें होतें. विठोबा केव्हां उठतो, याचीच आतां लोक वाट पहात होते. पण ती सभा तेवढ्यांत समाप्त व्हायची नव्हती. कारण अनिरुद्ध अकस्मात् तिथें प्रविष्ट झाला. खालच्या मानेनें नव्हे; अपराधी मुद्रेनें नव्हे; तर एखाद्या प्राचीन नाटकांतल्या धीरोदात्त नायकासारखा. त्याचा प्रवेश होतांच विठोबाच्या फुगऱ्या गालांवरच्या बारीक डोळ्यांत विषारी चमक उठली. त्याच्या डाव्या हाताचें स्फुरण सुरूं झालें. पण अनिरुद्धाला त्याची आतां कदर नव्हती. सभेंवर एक प्रशस्त दृष्टिक्षेप टाकून त्यानें बोलायला प्रारंभ केला.

" मित्र हो !

आजच्या सभेंत काय टरलं तें जरी मी कानांनीं ऐकलं नसलं तरी मला त्याचा अंदाज करतां येतो. झाल्या गोष्टींत माझं काडीइतकंहि नुकसान नाहीं; पण तुम्ही मात्र स्वतःच्या पायांवर धोंडा घालून घेतलात असं मी म्हणेन. मला घालवून देण्याच्या या ठरावावर मत देतांना तुम्ही तुमच्या मनाशीं प्रतारणा केली आहे. तुमच्या अंतःकरणांत या अनिरुद्ध मास्तराला जागा आहे, हें या घटकेलाहि मला स्पष्ट दिसतं आहे. राजमान्य राजेश्री विठोबांनीं माझ्यावर केलेले आरोप तुम्हांला मान्य नाहींत हें तुमचे डोळे मला सांगत आहेत. तुम्ही फक्त त्यांच्या दडपणाखालीं चेंगरलांत एवढंच काय तें. ठराव ' सर्वानुमतें ' मान्य झाला असला तरी तें सर्वानुमत फक्त एकट्या विठोबांचेंच हें माझ्या शाळेंतलं एखादं पोरसुद्धां सांगूं शकेल. एक मातब्बर पण अहंकारी व्यक्ति केवळ आपल्या वैय्यक्तिक हेव्यादाव्यासाठीं समाजाचा केवढा घात करूं शकते याचं आज मला प्रत्यंतर आलं.

" पण श्रीमंत विठोबाची मला इथून हुसकवण्याची इच्छा कितीही प्रबळ असली तरी जोंवर जनताजनार्दन मजवर प्रेम करतो, तोंवर मला इथून जातां येणार नाहीं. ज्या मुलांना मी हाताशीं धरलं त्यांना ज्ञान-सागराच्या तीरावर नेऊन सोडल्याशिवाय माझं इथलं कार्य पुरं होऊं शकत नाहीं. तेव्हां मी या विठोबांच्या समक्ष आज जाहीर करतों कीं उद्यांपासून माझी शाळा या समोरच्या पिंपळाच्या पारावर भरेल. जीं मुलं येतील त्यांना त्या पुण्यवृक्षाच्या छायेखालीं विद्यादानाचं कार्य अखंड चालू राहील.

मित्र हो ! आणखी एका दुष्ट घटनेची सूचना मी तुम्हाला आजच देऊन ठेवतों. कांहीं दिवसांनीं याच गांवांत एक कसाब एका गाईच्या गळ्याला फांस लावण्याचा प्रयत्न करणार आहे. त्याचा हात रोखण्यासाठीं सगळ्या शक्तीनिशीं मी प्रथम पुढं होईन. मात्र तुमचं मला पाठबळ मिळा-यला हवं. आजच्यासारखे तुम्हीं त्यावेळींहि जर मूग गिळून स्वस्थ बसाल तर ती हत्या तुमच्या माथीं पडेल हें लक्षांत ठेवा...! "

अनिरुद्धाचें हें निधडें भाषण ऐकून सर्वांच्या हृदयाला आंतून गुदगुल्या झाल्या. विठोबासावकाराला तृणासमान लेखणारा एक तरी हरीचा लाल जगांत आहे, ही जाणीव त्यांना अत्यंत संतोषप्रद वाटली. काळवंडाई ओतली ती विठोबाच्या तोंडावर मात्र. अनिरुद्ध तिथून बाहेर पडायच्या आंतच एवढा वेळ तिथें आजूबाजूला घोंटाळणारा अच्युत घराकडे दौडला. त्याची आक्का त्यावेळीं सांजवात लावून तुळशीवृंदावनापुढें उभी होती.

" आक्का गो ! मास्तर जात नाहींत. उद्यांपासून आमची शाळा पिंपळाच्या पारावर देवळांत मेळा जमला होता ना, तर असं नाटकांतल्या सारखं बोलले मास्तर, कीं विचारूं नको. सगळे कसे टकमक बघत राहिले त्यांच्या तोंडाकडे. अन् शेवटीं काय म्हणाले ? म्हणे, एक कसाब एका गाईला फांस लावणार आहे अन् त्यावेळीं त्याचा हात पकडायला मी पुढें होणार आहे..."

" खरं रे ? "

" अगदीं खरं. तुझ्या गळ्याच्यान् तर—"

रेवतीनें आपल्या गोंडस हातानें अच्युताला जवळ ओढलें. बहीण-भावंडें तुळशीच्या समोर एकत्र झालीं. रेवती अच्युताचें मुख कुरवाळीत म्हणाली.

" तुझ्या तोंडांत साखर पडो, माझ्या सोन्या ! "

समाप्त